डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशन सोसाएटीनें
बक्षीस दिलेलें पुस्तक.

# मराठी शब्दांचें उद्घाटन.

हा निबन्ध

**विद्याधर वामन भिडे** बी. ए.

ह्यांनीं रचिला

तो

" तत्त्वविवेचक " छापखाना
मुंबई
येथें छापिला.

इ. स. १९०५.



किंमत आठ आणे.

# मराठी शब्दांचें उद्घाटन.

## उपोद्घात.

निधानगर्भामिव सागराम्बरां
शमीमिवाभ्यन्तरलीनपावकाम् ।
नदीमिवान्तःसलिलां स्वरस्वतीं
नृपः ससत्वां महिषीममन्यत ॥

कालिदास, रघुवंश, सर्ग ३ श्लोक ९.

निधान उदरीं जिच्या धरणि ती विराजे जशी ॥
जिच्या जठरिं अग्नि ती विलसते शमी कां जशी ॥
जलौघ उदरीं जिच्या असि सरस्वती शोभती ॥
नृपाशि गमली तशी तंव निजा सगर्भा सती ॥

गणेशशास्त्री लेले.

"जगास जसजशी उन्नतावस्था प्राप्त होत गेली तसतसें त्यास क्रमाक्रमानें हरएक वस्तूसंबंधानें ज्ञान व अनुभव हीं आजपर्यंत मिळत आलीं आहेत व तीं मुख्यत्वेंकरून ग्रंथांमध्यें सांठविलीं गेलीं आहेत; तसेंच ह्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ ग्रथांच्याच द्वारानें मागच्या पिढीपासून पुढच्या पिढीस प्राप्त होत गेला," हा सिद्धांत कबूल न करणारे लोक प्रायः आढळावयाचे नाहींत. परंतु पुढील निबंधांत आम्ही कांहीं वेगळाच सिद्धांत वाचकांस सादर करून तो अनेक प्रमाणांनीं समर्थिणार आहों. तो सिद्धांत हा कीं, जगाचें ज्ञान व अनुभव हीं ग्रथांतच केवळ संचित झालेलीं असतात असें नव्हे, तर एकेकव्या शब्दांतसुद्धां हरएक प्रकारचें अमूल्य ज्ञान, अपूर्व अनुभव,

चमत्कारिक ऐतिहासिक माहिती, मनोविकारांच्या नैसर्गिक व्यापारांचीं प्रतिबिंबें वगैरे अनेक गोष्टी प्रादुर्भूत होतात. शब्दांच्या अभ्यासापासून मोठा लाभ आहे. जें ज्ञान प्राप्त होण्यास अनेक ग्रंथांचें परिशीलन करावयास पाहिजे तें ज्ञान कधीं कधीं एकएकट्या शब्दांत दृष्टोत्पत्तीस येतें. एखाद्या अजबखान्याचें दार आपल्या डोळ्यांपुढें एकदम उघडलें असतां ज्याप्रमाणें हरएक प्रकारच्या चीजा दृग्गोचर होऊन आपणांस सानंदाश्चर्य वाटतें, त्याप्रमाणें शब्दमय अजबखान्याचें कवाड कुशळ भाषावेत्त्यानें उघडलें असतां अननुभूत अशा आनंदाश्चर्यादि भावनांच्या लाटांनीं आपलें अंतःकरण जणूं काय उचंबळूं लागतें. अजबखान्यांत ठेवलेल्या प्रत्येक चीजेंत कांहींना कांहींतरी विशेष असतोच, कीं ज्या विशेषामुळें ती चीज आपल्या निरीक्षणाचा विषय होण्यास योग्य होते. कांहीं चीजा एकाद्या देशाचें किंवा एकाद्या प्रसिद्ध पुरुषाचें किंवा एखाद्या कुशळ कारागिराचें स्मरण करून देतात; कांहीं चीजा कारागिराच्या अपूर्व कसबाची किंवा दीर्घ प्रयत्नाची साक्ष देतात; कांहीं चीजा देशविशेषांची उन्नति दाखवितात; कांहीं चीजा इतिहासांतील लक्ष्यांत धरण्यास योग्य किंवा चमत्कारिक अशा प्रस्तावांनीं अंतःकरणास प्रसन्न करतात. भाषा हा एक प्रकारचा अजबखानाच आहे. त्यांतील पाहावयाच्या चीजा म्हणजे शब्द. ह्या शब्दांचें जर आपण योग्य दिशेनें व लक्ष्यपूर्वक मनन केलें तर आपणांस असें आढळेल कीं प्रत्येक शब्दामध्यें कांहीं तरी विशेष असतोच, व त्या विशेषामुळें तो शब्द अल्प प्रमाणानें तरी आपल्या ज्ञानवृद्धीचें एक साधन होऊन जातो. अजबखान्यांत ठेविलेल्या चीजा चर्मचक्षूस प्रसन्न करितात, त्याप्रमाणें भाषाभांडारांतील शब्दरूपी चीजा आपल्या मनश्चक्षूस प्रसन्न करितात. पुढील निबंधांत

आम्ही मराठी शब्दांचा वर निर्दिष्ट केलेल्या पद्धतीवर अभ्यास केल्यापासून आपणांस काय काय चमत्कारिक, उपयोगी व लक्ष्यांत बाळगण्याजोगी माहिती मिळण्याजोगी आहे याचें कांहीं उदाहरणांनीं स्पष्टीकरण करणार आहों. आम्ही पुढें जें विवरण करणार आहों तें म्हणजे सर्वांगांनीं संपूर्ण होईल असें नाहीं, व तें संपूर्ण करण्याचा आमचा संकल्पही नाहीं. कांकीं हें विवरण सर्वांगांनीं संपूर्ण करणें हें आमच्या सारख्या शब्दमीमांसेच्या महत्त्वाची प्रथमच चर्चा करणाऱ्या ग्रंथकारास शक्य नाहीं. आतां जरी आमचें विवरण प्रत्येक शब्दामध्यें अंतर्भूत असलेलें संपूर्ण ज्ञान परिस्फुट करणार नाहीं, तरी त्यावरून वाचकांस शब्दांच्या अभ्यासाचें महत्त्व अंशतः तरी कळून येईल यांत संशय नाहीं. जे शब्द आपण नेहेमीं उच्चारतों, जे शब्द आपण घरींदारीं, बाजारांत, दुकानांत, प्रेमाच्या किंवा रागाच्या भाषणांत, किंवा हरएक प्रकारचे रोजचे व्यवहार करतांना योजतों, जे शब्द आपण केवळ विचार प्रकट करण्याचीं साधनें म्हणून समजतों, ते शब्दसुद्धां जिज्ञासूंची जिज्ञासा तृप्त करून त्यांच्या मनास आनंदित करण्यास समर्थ असतात असें वाचकांस आढळून येईल.

आपली मराठी भाषा अनेक भाषांच्या शब्दसंग्रहानें समृद्ध आहे. मेणाप्रमाणें वाटेल त्या तऱ्हेनें वळवितां येणारी, मनोगत विचार ओतावयास तऱ्हेतऱ्हेच्या अनंत ठशांनीं समृद्ध असलेली व अत्यंत प्रगल्भ जी जगद्वंद्य संस्कृत भाषा तिची मराठी भाषा ही एक भाग्यशाली कन्या आहे. संस्कृताच्या इतर कन्यकांपेक्षां ( म्हणजे गुजराथी, बंगाली व हिंदी ह्या भाषांपेक्षां ) मराठीमध्यें मातेची शक्ति व सामर्थ्य, शुचिता व सरळपणा, साधनें व साधनें घडविण्याची ताकत, सौंदर्य व

गांभीर्य इत्यादि गुण अधिक प्रमाणानें असून तिच्या ठायीं मातेचें प्रतिबिंब बऱ्याच साकल्यानें उमटलेलें आहे, आणि तिला फारशी व अरबी इत्यादि भाषांची उत्कृष्ट पुष्टि मिळून ती आजमितीस बऱ्याच समृद्ध दशेस येऊन पोहोंचली आहे.

अशा ह्या मराठी भाषेच्या शब्दांचा अभ्यास करणें म्हणजे शब्दांची व्युत्पत्ति शोधून काढणें, नवीन शब्द कोणच्या द्वारांनीं व कोणच्या प्रसंगीं प्रथम प्रचारांत आले, व ते ते शब्द आपण भाषेमध्यें कोण कोणच्या कारणांनीं अंतर्भूत करून घेतले, शब्दांचे अर्थ बदलण्याचीं कारणें काय काय झालीं वगैरे गोष्टी सप्रमाण ठरविणें हें मेहनतीचें व दीर्घोद्योगाचें काम आहे. परंतु सृष्टीचा असा नियम आहे कीं, ज्या मानानें मेहनत व दीर्घोद्योग ह्यांचें कोणत्याही कामामध्यें अवलंबन करावें त्या मानानेंच फलनिष्पत्ति आनंददायक असते. मराठी शब्दांचा अभ्यास आमच्या वाचकांपैकीं जे कोणी करण्यास प्रवृत्त होतील त्यांस त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें लाभ व मनोरंजन हीं प्राप्त होतील. शिवाय त्यांस प्रसंगविशेषीं असेंही आढळेल कीं, सबंध काव्याच्या वाचनापासून होणारें मनोरंजन एका एका शब्दानें होतें; सबंध इतिहासग्रंथापासून मनावर पडणारा प्रकाश एका एका शब्दापासून पडतो, मानसशास्त्रावरील एकाद्या समग्र ग्रंथापासून मानसिक विकारांचें प्रतीतीस येणारें सापेक्ष प्राबल्य हें एका एका शब्दानें प्रतीतीस येतें. असा जर शब्दांच्या अभ्यासाचा महिमा आहे, तर हा अभ्यास करूं इच्छिणाऱ्या मनुष्यास निरुत्साह होण्याचें कांहीं कारण नाहीं, हें उघड आहे.

भाषेंतील शब्दांस आम्ही आस्थिनांची उपमा देतों. हजारों वर्षांमागें जे प्राणी पृथ्वीच्या पृष्ठभागावर संचार करीत असत, किंवा ज्या वनस्पति पृथ्वीच्या पृष्ठभागास शोभायमान करीत

असत, त्यांचे सांगाडे दगडांच्या गर्भामध्यें सांपडल्यामुळें त्यांच्यावर काळाचा विध्वंसक परिणाम न होतां आज मितीस उपलब्ध होतात त्या सांगाड्यांस आस्थिनें म्हणतात. हीं आस्थिनें त्या त्या प्राण्यांच्या किंवा वनस्पतींच्या आकारांविषयीं, आकृतींविषयीं वगैरे जिज्ञासु व शोधक पंडितांस माहिती देतात, व हजारों वर्षांमागील भूतलाचा नकाशाच जणूं काय त्याच्या विस्मित व आनंदित अशा अंतश्चक्षूपुढें पसरतात. आस्थिनांचें हें महत्त्व मनांत आणून आधुनिक पंडितांनीं त्यांचेवर मोठमोठाले ग्रंथ रचले आहेत. सृष्टिशास्त्रज्ञास ज्याप्रमाणें हीं आस्थिनें त्याचप्रमाणें भाषाशास्त्रज्ञांस शब्द होत. ह्या शब्दांपासून अन्यथादुर्मिळ अशी नानाविध माहिती समजते. जे लोक पंचत्वाप्रत पावून त्यांचें नांवगांवसुद्धां आजमितीस कोणास ठाऊक नाहीं, त्या लोकांचे आचार आणि विचार, कल्पना आणि हृद्गत, ईप्सित आणि आकांक्षित वगैरे हरएक गोष्टी त्यांच्या भाषेमधील शब्दांत दृग्गोचर होतात. त्या लोकांचें कवित्व त्यांच्या काव्यांतच आढळतें असें नव्हे, तर तें एकएकऱ्या शब्दांतसुद्धां आढळतें. त्यांचा इतिहास त्यांच्या बखरींतून आढळतो तसा तो एकएकव्या शब्दांतसुद्धां आढळतो. त्यांची नीतीही त्यांच्या धर्मग्रंथांत आढळते तशी ती शब्दांतसुद्धां आढळते. भाषेंतील शब्दांच्या महत्त्वाविषयीं व्हिट्नी ह्या नांवाच्या एका प्रसिद्ध अमेरिकन ग्रंथकारानें म्हटलें आहे:—

But language is also pregnant with information respecting races which lies quite beyond the reach of physical science: it bears within itself plain evidences of mental and moral character and capa-

city, of degree of culture attained, of the history of knowledge, philosophy and religious opinion, of intercourse among peoples, and even of the physical circumstances by which those who speak it have been surrounded. It is, in brief, a volume of the most varied historical information to those who know how to read it, and to derive the lessons it teaches.

"Whitney's Language and Study of Language."

शब्दांच्या अभ्यासापासून अमूल्य ज्ञान प्राप्त होतें ह्या आमच्या विधानाच्या समर्थनार्थ प्रत्येक जातीचीं एक एक दोन दोन उदाहरणें आम्ही देणार आहों; परंतु आधीं आम्ही कोणच्या पद्धतींवर ह्या विषयाची परिस्फुटता करणार आहों हें वाचकांस कळलें असतां सोईवार होईल असें जाणून प्रथम तसें करतों.

आमच्या विषयाचे आम्ही तीन भाग करणार आहों. १. ज्या शब्दांमध्यें कवित्व दृष्टीस पडतें अशा शब्दांचा उहापोह एका भागांत करूं. २. ज्या शब्दांपासून मनुष्याच्या नीतीची उन्नति किंवा अवनति दृष्टीस पडते, किंवा मनुष्यास उत्कर्ष अथवा अपकर्ष प्राप्त झाला असतां तो ज्या शब्दांत प्रतिबिंबित होतो, अशा शब्दांचा उहापोह एका भागांत करूं. व ३. ज्या शब्दांपासून प्राचीन इतिहास अवगत होतो अशा शब्दांचा उहापोह एका भागांत करूं. कवित्वगर्भ, नीतिगर्भ व वृत्तगर्भ हे शब्दांचे तीन विभाग न्यायशास्त्रदृष्ट्या यथोचित व विशिष्ट प्रदेशास व्यापणारे आहेत असें आम्ही म्हणूं शकत नाहीं. एका वर्गांत जो शब्द आम्ही घालूं तो दुसऱ्या वर्गांतहीं जाऊं शकल. म्हणजे जो शब्द आम्ही कवित्वगर्भ ह्या वर्गांत घालू त्याच्यापासून ऐतिहासिक माहितीसुद्धां जर मिळण्या-

जोगी असली तर तो शब्द वृत्तगर्भ शब्दांच्या वर्गामध्येंही समाविष्ट करण्याजोगा असेल; परंतु आम्ही जे तीन वर्ग केले आहेत ते न्यायशास्त्रदृष्ट्या परस्परांपासून अत्यंत भिन्न नसल्याकारणानें तसें होण्याचा संभव आहे हें उघड आहे.

एथें दुसरें असें एक सांगणें इष्ट वाटतें कीं, जगामध्यें कवित्व, नीति व इतिहास ह्यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं, असें ज्या अर्थी नाहीं, त्या अर्थी शब्दांचे कवित्वगर्भ, नीतिगर्भ व वृत्तगर्भ इतके तीनच वर्ग करतां येतील, अधिक येणार नाहींत, असें नाहीं. ह्या तीन वर्गाप्रमाणेंच आचारगर्भ, विचारगर्भ वगैरे आणखी अनेक वर्ग बांधतां येतील. अशा वर्गांचा पूर्ण उहापोह करण्याची सामग्रीही आमच्याजवळ थोडी बहुत आहे व तिच्या आधारावर ग्रंथरचना केल्यास वाचकांस तीही मनोरंजक होईल असें आम्हास वाटतें; परंतु भाषापरिज्ञानावर ह्या नमुन्याचा हा पहिलाच ग्रंथ असल्याकारणानें विषयाचें साकल्यानें निरूपण करणें इष्ट नाहीं, असें आमचें मत आहे. एक तर ह्या विषयाची अभिरुचि मराठी वाचकांस कितपत वाटेल ह्याची आम्हास कल्पना नाहीं, व ती अभिरुचि लोकांस नसल्यास आमचे श्रम व्यर्थ जातील. दुसरें कारण हें कीं, विद्वान् लोकांच्या दृष्टीनें आमच्या विवेचनांत दोष काय काय आहेत हें अगोदर समजलें असतां पुढें निर्दोष विवेचन करणें हें सोपें होईल. तिसरें असें कीं, ज्या सामग्रीच्या आधारावर तें विवेचन करावयाचें ती सामग्री कालगतीनें वाढेल व निर्दोष होईल अशी आम्हास आशा आहे. ह्या व दुसऱ्या कांहीं कारणांसाठीं आम्ही आमच्या सामग्रीचा कांहीं भाग मात्र प्रस्तुतच्या विवेचनास आधारभूत घेऊन कवित्वगर्भ, नीतिगर्भ व वृत्तगर्भ असे मुख्य तीन वर्ग करून प्रत्येकाच्या उहापोहास

एक एक भाग देण्याचें योजलें आहे. आतां एथें पुढें येणाऱ्या विषयाच्या स्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन करण्यासाठीं मासल्या करितां प्रत्येक वर्गाचीं एक दोन उदाहरणें देतों.

**पातक** व **पंक** हे शब्द कवित्वगर्भ आहेत. ज्या पुरुषानें पापाला पातक, पंक अशीं नांवें दिलीं तो पुरुष कवीच्या दिव्यचक्षूनें उपलक्षित होता, ह्याविषयीं कोणास तरी शंका वाटेल काय? पातक ह्या शब्दामध्यें अनुभवानें मनाच्या प्रतीतीस येणारा अयोग्य कृत्याचा परिणाम चर्मचक्षूस प्रत्ययास येईल अशा रीतीनें वर्णिलेला आहे, तो किती जोरदार व हृदयंगम आहे बरें? अयोग्य कर्म करणारा मनुष्य क्रमाक्रमानें समाजाच्या प्रेमापासून कसा च्युत होत जातो, पुण्यकर्मानें स्वर्गामध्यें प्राप्त होणाऱ्या अक्षय्य स्थानास तो कसा मुकतो व स्वर्गस्थिति तर राहूं द्यो, तो प्रत्यक्ष आपल्या स्वतःच्या मनाच्या आदरापासून कसा भ्रष्ट होतो, हें ज्या पुरुषानें प्रथम पाहिलें—किंवा न जाणों अनुभविलें—आणि त्यावरून वाईट कृत्यांस पातक असें नांव दिलें, त्याच्या दिव्यचक्षूनें किती विस्तृत, किती खोल अनुभव एका शब्दामध्यें गोंविला आहे बरें? एथें बुद्धिगोचर पदार्थांचें चक्षुर्गोचर वस्तूंशीं तादात्म्य करून पापाचें स्वरूप किती जोरानें रेखिलें आहे!

त्याचप्रमाणें ज्या पुरुषानें पापास **पङ्क** (चिखल) असें नांव दिलें त्याला कवीचा दिव्य चक्षु नव्हता असें कोण म्हणूं शकेल? आपल्या आद्य कवीनें बालकांडांत अकर्दम ह्या नांवाच्या तीर्थाचें असें गोड वर्णन केलें आहे:—

**अकर्दममिदं तीर्थं भारद्वाज निशामय ।**
**रमणीयं प्रसन्नं च सज्जनानां मनोयथा ॥**

ह्या वर्णनांतील पाण्याची रमणीयता व प्रसन्नता आणि त्या तशा

पाण्याचें सज्जनाच्या मनाशीं सादृश्य हीं आद्य कवीच्या कवित्वाची साक्ष देतात. वाल्मीकीनें जें कवित्व ह्या स्थळीं दर्शविलें तेंच कवित्व ज्या पुरुषानें पापाचा पंक ह्या शब्दानें प्रथम निर्देश केला त्याणें दाखविलें नाहीं काय?

मागें आम्ही म्हटलेंच आहे कीं, मनुष्याच्या मनाची उन्नति अथवा अवनति, चांगल्या गोष्टींकडे किंवा वाईट गोष्टींकडे कल वगैरे हीं शब्दांचे ठायीं प्रतिबिंबित झालेलीं आढळतात. तसेंच शब्द कधीं कधीं मूळच्या चांगल्या अर्थापासून भ्रष्ट होऊन वाईट अर्थ पावतात किंवा मूळचा वाईट अर्थ सोडून नंतर चांगला अर्थ दर्शवूं लागतात; शब्दाची व्याप्ति चांगल्यावर व वाईटावर समान असतां चांगल्यावरच किंवा वाईटावरच ती नियंत्रित केली जाते; आणि कार्य व कारण ह्यांचे निकट संबंध व साततिक साहचर्य यांवरून कार्यवाचक शब्द कारणवाचक होतो किंवा कारणवाचक शब्द कार्यवाचक होतो. ह्या सर्व प्रकारांची प्रतीति देणारे शब्द भाषेमध्यें अनेक असतात व मराठी भाषेमध्यें तर ते शेंकडों आहेत.

**छांदिष्ट, आर्ष, लाघवी, व्रात्य, साला** इत्यादि अनेक शब्दांचे सांप्रतचे रूढ झालेले अर्थ व त्यांची व्युत्पत्ति हीं मनांत आणलीं असतां वरील विधानाविषयीं वाचकांची खात्री होईल. **व्रात्य** हा शब्द आपण द्वाड ह्या अर्थानें योजतों. परंतु त्याचा अर्थ नेहमीं समुदायांत असणारा असा आहे. संस्कृत व्रात (समुदाय) ह्या शब्दापासून तो उत्पन्न झालेला आहे. परंतु जीं मुलें घरांत बसून न राहतां नेहमीं रस्त्यामध्यें पोरांच्या समुदायांत जातात तीं तशा कुसंगतीच्या योगानें खोडकर होणें व आईबापांच्या योग्य नीतिमत्तेचा कित्ता उचलण्याविषयीं पराङ्मुख अशीं होणें हें सृष्टीच्या नियमास अनुसरूनच आहे.

मग अशा मुलांच्या अंगांत हे नियमानें असणारे दुर्गुण सतत दृष्टीस पडल्यामुळें व्रात्य शब्द, जो पूर्वीं समुदायांत कालक्षेप करणारा असा अर्थ दाखवीत असे, तो द्वाड असा अर्थ दाखवूं लागला ह्यांत आश्चर्य काय आहे? **छांदस** ह्या शब्दांत पूर्वीं निंदाव्यंजक असें कांहीं नव्हतें. छंदस् ह्याचा पद्य किंवा वेद असा मूळचा अर्थ. संस्कृत भाषा ही एकदा प्रचलित म्हणजे बोलण्याची भाषा असल्याकारणानें प्रचलित भाषेच्या नियमांप्रमाणें तींमध्यें हरएक फेरफार कालगतीनें होत गेले. सजीव शरीरांत जसे फेरफार होतात, म्हणजे क्षय आणि वृद्धि हे व्यापार सदोदित चाललेले असतात, शरीरांतील कांहीं द्रव्यें नाश पावून त्याच्या जागीं नवीं द्रव्यें येतात, किंवा जुनीं द्रव्यें वेगळ्या उपयोगास लागतात, त्याचप्रमाणें प्रत्येक जिवंत भाषेमध्येंही हे सर्व व्यापार एक सारखे चाललेले असतात. व ह्या नियमाप्रमाणें कांहीं शब्द व रूपें वगैरे हीं संस्कृत भाषेंतून नाहींशीं झालीं तेव्हां त्यांस **छांदस** म्हणजे "वेदांतील" असें पाणिन्यादि वैय्याकरणांनीं नांव दिलें. देवासः ( देवाः ), कर्णेभिः (कर्णैः), परिधापयित्वा ( परिधाप्य ), इतरं ( इतरत् ), पंथाः (पंथानः) ससुव ( सुषुवे ), वगैरेस त्यांनीं छांदस असें नांव दिलें. त्यावेळेस छांदस शब्दामध्यें निंदेचा अर्थ बिलकूल नव्हता. परंतु "लोकव्यवहाराच्या बाहेरचा" असा सामान्य अर्थ घेऊन लोकांनीं छांदस शब्दाचा अर्थ तऱ्हेवाईक, चमत्कारिक, जनाची पर्वा न बाळगणारा, असा निंदाव्यंजक केला. **भट** ह्या शब्दाचा अर्थ मुंबई वगैरे ठिकाणीं आचारी अथवा पाणक्या असा झाला आहे. भट ह्या शब्दाच्या अर्थविपर्यासाविषयीं वे. शा. सं. गोविंद शंकर शास्त्री बापट ह्यांच्या व्युत्पत्तिप्रदीपांतून एथें एक मार्मिक उतारा घेतों.

"इंग्रजी राज्यांत आलीकडे विश्वविद्यालयें (University) स्थापित होऊन एकाद्या विद्येंत पारंगत होऊन त्यांत त्याची परीक्षा उतरली म्हणजे त्यास कलास्वामी ( M. A. म्ह० Master of Arts ) अशी पदवी मिळते. त्याप्रमाणें पूर्वी न्याय, मीमांसा, व्याकरण वगैरे विषयांत महापंडित होऊन जे सर्वमान्य, चिरस्थायी, अत्युत्तम असे ग्रंथ लिहीत, त्यांस भट्ट अशी पदवी मिळे. जसें गदाधर भट्ट, नागोजी भट्ट. अलीकडे बराच कालपर्यंत विद्या ब्राह्मणच करीत असल्यामुळें भट्ट अशी पदवी धारण करणारे ब्राह्मणच असत. हल्लीं जशी मोठ्या अधिकाऱ्यांस रावसाहेब वगैरे पदवी मिळाली म्हणजे त्यांच्या मुलांस अंगीं कांहीं पराक्रम नसला तरी लोक रावसाहेब म्हणूं लागतात ; किंवा एखादा यज्ञाची दीक्षा घेऊन दीक्षित झाला म्हणजे त्याच्या कुलांतील सर्वांस दीक्षित म्हणूं लागतात ; त्याप्रमाणें ब्राह्मणांस थोडी बहुत विद्या असली म्हणजे भट्ट म्हणण्याची चाल पडली. पुढें उत्तरोत्तर ब्राह्मणांच्या विद्येचा ऱ्हास होत चालला तरी भट्ट हा शब्द चालू राहिला ; परंतु पुढें त्याचा एक टकार जाऊन तो जसा रूपानें हलका झाला तसा तो अर्थानेंही हलका झाला. गुजराथेकडील ब्राह्मणांत विद्येचा अगदींच लोप होऊन ते पाणी भरण्याचें काम करूं लागले त्या मुळें मुंबई वगैरे शहरांत भट म्हणजे पाणक्या ब्राह्मण इतक्या अर्थावर मजल येऊन पोंचली."

वरील उताऱ्यांत शास्त्रीबोवांनीं गुजराथेंतील ब्राह्मणांच्या विद्येचा लोप झाल्यामुळें मुंबईत भट ह्याचा अर्थ हलका झाला आहे, असें म्हटलें आहे. दक्षिणी ब्राह्मणांमध्येंही विद्येचा असाच लोप होऊन दारिद्र्यामुळें ब्राह्मणांस दुसऱ्याचे घरीं मोलानें पाणी भरणें, मोलानें स्वयंपाक करणें, वगैरे हलकीं

कामें पतकरावीं लागलीं. त्यामुळें अर्थातच ब्राह्मण हा मोठा अभिमानव्यंजक शब्द आचारी व पाणक्ये ह्यांचा वाचक झाला आहे. ब्राह्मण शब्दाचा असा अर्थ महाराष्ट्रांत प्रचारांत आहे. ब्राह्मण शब्दाचा एक उन्नत अर्थही झाला आहे हें पुढें दाखविण्यांत येईल.

शब्दांच्या अर्थाच्या अवनतीचें राग हा शब्द एक उत्कृष्ट उदाहरण आहे. **राग** ह्या शब्दाचा संस्कृतांत तांबडेपणा ( लालपणा ) असा मूळचा अर्थ आहे. पुढें त्यापासून प्रीति असा अर्थ झाला. कारण अंतःकरणांत प्रेमरसाची उकळी फुटली असतां चेहऱ्यावर गुलाबी रंगाची छटा मारते. आणि कार्यवाचक शब्दाची योजना सहजच कारणाबद्दल होऊं लागून राग हा शब्द प्रेमाचा वाचक झाला. परंतु मराठींत राग ह्याचा अर्थ क्रोध असा आहे, आणि हा अर्थ मूळच्या अर्थाहून अगदीं विपरीत असा आहे. हा अर्थ त्यास कसा प्राप्त झाला ? प्रेमभरानें चेहऱ्यावर जशी लाली येते तशी क्रोधानेंही येते. परंतु प्रेमाच्या लालीपेक्षां क्रोधाचीच लाली चेहऱ्यावर अधिक प्रसंगीं दृष्टोत्पत्तीस येते, व प्रेमापेक्षां क्रोधच प्रबलतर असतो. यावरून राग हा लालीचा वाचक शब्द असून क्रोधाचा वाचक झाला, व त्याचा संस्कृतांतील प्रेम हा लाक्षणिक अर्थ नष्ट झाला. ज्या लक्षणेनें राग हा लालीचा वाचक शब्द असून संस्कृतांत प्रेमाचा वाचक झाला, त्याच लक्षणेनें तो मराठींत क्रोधाचा वाचक झाला. ही त्या शब्दाच्या अर्थाची अवनति प्रत्येक मनुष्यानें लक्ष्यांत बाळगण्याजोगी आहे. आपल्या चांगल्या मनोविकारांपेक्षां दुष्ट मनोविकार जसे संख्येनें अधिक आहेत, तसेच ते बळानेंही अधिक आहेत. ह्याची राग

हा शब्द एक चिरस्थायी खूण आहे, व आपण आपले दुष्ट मनोविकार आपल्या आटोक्यांत ठेवण्याचा प्रयत्न करीत असलें पाहिजे, असा उपदेशच जणों काय तो आपणास करितो.

वर आम्ही म्हटलें आहे कीं, शब्द हे आस्थिनरूप इतिहास आहेत. ह्याचें उदाहण म्हणून एक शब्द देतों. आपण **फिरंगी** हा शब्द यूरोपी लोकांस किंवा विशेषतः पोर्चुगीज लोकांस लावतों. हा शब्द कोठून व किती लांबची मुशाफरी करून आपणाकडे आला आहे, व ही मुशाफरी करण्यास त्याला किती काळ लागला, ह्याची कल्पना कोणास तरी आहे काय? हा शब्द आपणामध्यें आला आहे तो अर्धी पृथ्वी वलांडून आला आहे. वाटेनें येतांना त्यानें पुष्कळ ठिकाणीं मुक्काम केले, व ही मुशाफरी करण्यास त्याला वर्षें सुमारें दोन हजार लागलीं हें ऐकून कोणास आश्चर्य व विस्मय वाटणार नाहीं? परंतु इतकेंच नव्हे. हा शब्द आपण त्याच्या जन्मभूमीस नेऊन पोंचवींतोंपर्यंत आपणास शेंकडों वर्षांचा, कित्येक राष्ट्रांच्या परिवर्तनाचा, अनेक देशांचा, मोठ मोठ्या युद्धांचा, अनेक क्रूर व अमानुष कृत्यांचा व अनेक साहसी पुरुषांचा इतिहास विदित होऊन आपलें अंतःकरण विस्मयानें व आश्चर्यानें थक्क होऊन जातें.

पूर्वीं म्हणजे इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत जर्मनीमध्यें एक जनसमूह असे. तो आपणास फ्रांक लोक असें म्हणवीत असे. फ्रांक ह्याचा अर्थ स्वतंत्र. हे लोक स्वतंत्रताप्रिय असून शिवाय स्वतंत्रही होते. इसवी सनाच्या पांचव्या शतकांत रोमच्या बादशाही अमलाचा ऱ्हास होऊन त्या राज्याचीं शकलें झालीं तेव्हां गाल देशानें रोमन लोकांचें स्वामित्व झुगारून दिलें. परंतु ही संधि साधून वर सांगितलेल्या फ्रांक लोकांनीं

गालदेशावर धाड घातली, व तो देश काबीज करून घेतला. त्यांनीं मूळच्या रहिवाशांची पायमल्ली करून किंवा त्यांस आपल्या समाजांत सामील करून घेऊन, त्या देशांत आपली सत्ता स्थापित केली. ह्या नवीन संपादिलेल्या देशांत त्यांचें इतकें प्राबल्य वाढलें कीं, त्या देशाचें मूळचें गाल हें नांव रद्द होऊन त्यास फ्रान्स हें नांव आलें. तें नांव त्या देशास आज १५०० वर्षें चालत आहे.

गाल देशांत आलेले हे फ्रांक लोक गालच्या मूळच्या रहिवाशांपेक्षां व सभोंवतालच्या राष्ट्रांतील लोकांपेक्षां अधिक स्वतंत्रताप्रिय, अधिक सत्याभिमानी व अधिक निस्पृह होते. हा त्यांचा सद्गुण शेजारच्या लोकांच्या अवगुणाच्या विरोधानें स्पष्टतर दृग्गोचर होत असे, तेव्हां अर्थातच सांततिक साहचर्याच्या कारणानें फ्रांक हा शब्द मनाचा मोठेपणा, सरळपणा ह्या गुणांचा वाचक झाला. पुढें ह्या नव्या अर्थानें उपलक्षित असा हा शब्द नार्मन लोकांसहवर्तमान इ० स० १०६६ मध्यें इग्लंडांत गेला. तो आजमितीसही मनाचा थोरपणा व सरळपणा ह्या अर्थानें इंग्रजी भाषेंत योजला जातो. ह्याप्रमाणें हा शब्द जर्मनींतून फ्रान्सांत, व फ्रान्सांतून इग्लंडांत गेला, परंतु त्याची हिंदुस्थानाप्रत कोणच्या वाटेनें कशी मुशाफरी झाली हें पाहावयाचें अद्यापि राहिलें आहे. अकराव्या शतकांत यूरोपखंडामध्यें ख्रिस्ती धर्माच्या अनुयायांत एक धर्मवेडाची प्रबल लाट आली, तिनें तें सारें खंड हालवून सोडिलें, व प्रत्येक किरिस्तांवास परधर्मी लोकांचा ( विशेषेंकरून महंमदी धर्माच्या अनुयायांचा ) संहार करणें हें श्रेयस्कर काम आहे असें वाटूं लागलें. तेव्हां मुसलमानी लोकांचा संहार करण्यासाठीं सारे युरोपी किरिस्तांव लोक इ० स० १०९८ मध्यें पालेस्टाईन येथें येऊन

दाखल झाले. पुढें काय काय झालें याचा तपशील न देतां आम्हां थोडक्यांत इतकेंच सांगतों कीं, मुसलमानांचा संहार करण्याचा हा क्रम धर्मवेडाची लाट कमी किंवा ज्यास्ती प्रबल होई त्या मानानें २०० वर्षें पुढें चालत राहिला. ह्या कृत्यामध्यें फ्रेंच लोकांनीं आपल्या संख्येनें, दृढनिश्चयानें आणि महत्त्वानें बाकीच्या युरोपी राष्ट्रांस मागें सारलें, तें इतकें कीं, मुसलमानी लोक फ्रांक याच नांवानें सर्व धर्मयोद्धयांचा निर्देश करूं लागले. अशा रीतीनें फ्रांक हा शब्द जो प्रथम जर्मनींतील एका जनसमूहाचा वाचक होता, व जो पुढें सर्व फ्रान्सांतील लोकांचा वाचक झाला, तोच मुसलमानी भाषेमध्यें सर्व युरोपी लोकांचा वाचक झाला. पुढें पालेस्टाईन मधून तो शब्द अरबस्तानांत उतरला व व्यापारी अरबांसहवर्तमान हिंदुस्तानांत आला. इ० स० १५०० मध्यें पोर्तुगीज लोकांचें हिंदूंस किरिस्तांव करण्याचें मिशन जेव्हां मलबारच्या किनाऱ्यावर येऊन थडकलें तेव्हां अरब लोकांस पोर्तुगीज लोक पूर्वीं माहित होतेच व ते त्यांस अर्थातच फिरंगी लोक असें म्हणूं लागले. कारण त्यांच्या भाषेंत फिरंगी ह्या शब्दानें सर्व यूरोपी लोक असा बोध होत असे. परंतु आपणास युरोपी लोक ठाऊक नसल्यामुळें जे यूरोपी लोक पहिल्यानेंच आपल्या दृष्टीस पडले त्यांचा वाचक फिरंगी हा शब्द झाला, व त्यांच्या मागून, डच, फ्रेंच व इंग्रज वगैरे यूरोपी लोक आले, त्यांसही फिरंगी हा शब्द आपण लावूं लागलों. पण सर्वांसच फिरंगी म्हणण्यापासून घोंटाळा होऊन तो शब्द हल्लीं (निदान कोंकणपट्टींत तरी) चिरपरिचित अशा पोर्तुगीज लोकांस मात्र लावण्यांत येऊं लागला. घाटावर जुने लोक सर्व यूरोपी लोकांस फिरंगी म्हणतात, परंतु तेथेंही हा प्रचार हल्लीं कमी होत चालला आहे.

कर्नाटकांत हा शब्द सर्व यूरोपी लोकांस व देशी किरिस्तांवांस लावतात. याप्रमाणें फिरंगी ह्या शब्दाचें मूळ शोधतांना आपणास किती तरी ऐतिहासिक माहिती मिळते!

वरील दिग्दर्शनावरून वाचकांची खात्री होईल कीं, ज्या विषयामध्यें आतां आपण प्रवेश करणार आहों तो कंटाळवाणा किंवा रूक्ष नाहीं. कारण ज्ञान आणि विशेषेंकरून नवीन ज्ञान हें नेहमीं मनोरम असून ज्ञानप्राप्तीकडे प्रत्येक मनुष्याची थोडी तरी प्रवणता असतेच. ह्या प्रवणतेस जर योग्य दिशा मिळाली तर ज्ञानप्राप्तीचें काम मोठें सुलभ व मनोरम होतें. आतां आम्ही जें ज्ञानभांडार उद्घाटणार आहों तें जर वाचकांस कदाचित मनोरंजक न वाटलें तर आमचेकडून उद्घाटनाचें काम योग्य रीतीनें झालें नाहीं, असें त्यांनीं समजावें; विषयच नीरस किंवा रूक्ष आहे असें समजूं नये.



# प्रकरण पहिलें.

## कवित्वगर्भ शब्द.

आम्ही उपोद्घातांत म्हटलें होतें कीं, भाषेच्या शब्दांमध्यें कवित्व, नीति आणि वृत्त हीं दृष्टीस पडतात. ह्या प्रकरणामध्यें शब्दगत कवित्वाचें अधिक खुलासेवार निरूपण करावयाचें आम्ही योजलें आहे. कवित्व म्हणजे काय हें वाचकांस सांगितलें पाहिजे. सामान्य जनांचा असा समज असतो कीं, गणमात्रादिकांच्या कांहीं विशिष्ट अनुक्रमानें व यमकादिकांनीं उपलक्षित अशी जी शब्दांची रचना तेंच काव्य होय. परंतु ही छंदोबद्ध रचना काव्यास आवश्यक नाहीं. स्त्रीच्या स्त्रीत्वास जशी नथेची आवश्यकता नाहीं तशी काव्याच्या काव्यत्वास छंदोबद्ध रचनेची आवश्यकता नाहीं. काव्याचें काव्यत्व शब्दादिकांच्या कांहीं विशिष्ट रचनेवर अवलंबून नसतें. तें अंतर्गत विचारांच्या चारुतेवर अवलंबून असतें. प्रत्येक देशाच्या विद्वानांचें हेंच मत आहे. ते छंदोबद्ध रचनेस महत्त्व देत नाहींत. ही रचना काव्याचें बाह्य स्वरूप अधिक मनोहर करते इतकेंच. आपल्या प्राचीन साहित्यशास्त्रकारांनीं काव्याच्या वेगवेगळ्या व्याख्या दिलेल्या आहेत, परंतु एकाही साहित्यशास्त्रकारानें छंदोबद्ध रचना ही काव्याचा एक आवश्यक गुण आहे, म्हणजे ह्या प्रकारच्या रचनेवांचून काव्यास काव्यत्व प्राप्त व्हावयाचें नाहीं, असें म्हटलेलें नाहीं. ह्याच साहित्यशास्त्रकारांचें काव्याच्या लक्षणाचें स्वरूप मनांत आणून आम्ही कवित्वगर्भ ह्या शब्दांतील कवित्व हा शब्द योजला आहे.

मनोहर सादृश्याच्या किंवा मनोहर आरोपाच्या किंवा मनोविकार क्षुब्ध झाले असतां सहज होणाऱ्या अतिशयोक्तीच्या

पायावर उभारलेली जी कल्पना तिला आम्ही काव्य असें म्हणतों. मग ही कल्पना वाक्यात्मक असो किंवा एक शब्दात्मक असो. ती कल्पना एका शब्दामध्येंच असली तर तो शब्दसुद्धां काव्य हें अभिधान पावूं शकतो. आम्ही कल्पनेला मनोहर सादृश्याचा किंवा मनोहर आरोपाचा किंवा मनोहर अतिशयोक्तीचा पाया पाहिजे असें वर म्हटलें आहे, त्यांत मनोहर हा शब्द महत्त्वाचा आहे. सादृश्य जर साधें असलें किंवा आरोप जर साधा असला, किंवा अतिशयोक्ति साधी अथवा नीरस असली तर तेथें काव्य ह्या शब्दाची योजना करतां यावयाची नाहीं. 'पाकोळीचें तोंड माणसाच्या तोंडाप्रमाणें असतें' ह्या वाक्यांत पाकोळीचें तोंड व माणसाचें तोंड ह्या दोहोंमध्यें सादृश्य वर्णिलेलें आहे. परंतु ह्या सादृश्यामध्यें मनोहरपणाचा अभाव असल्याकारणानें त्यास काव्य म्हणतां यावयाचें नाहीं. निर्जीव वस्तूवर सजीवत्वाचा आरोप किंवा सजीव वस्तूवर निर्जीवत्वाचा आरोप जर मनोहर रीतीनें केलेला असेल तर तो आरोप काव्य ह्या अभिधानास पात्र होऊं शकेल. ह्यावरून वाचकांस कळून येईल कीं, काव्याची निष्पत्ति होण्यास अनेक शब्दांची आवश्यकता आहे असें नाहीं. एका एका शब्दानेंसुद्धां काव्याची निष्पत्ति होऊं शकेल, आणि काव्य करणाऱ्या कवीच्या कवित्वाचा प्रादुर्भाव एका एका शब्दांतसुद्धां होऊं शकेल. सूर्याचें प्रतिबिंब विस्तीर्ण महासागरावर साकल्यानें पडलेलें जसें दृग्गोचर होतें, तसें तें एका लहानशा जलबिंदूवरही पडलेलें दृष्टीस पडतें. त्याप्रमाणेंच मोठमोठ्या ग्रंथांत कवीचें कवित्व जसें प्रतिबिंबित झालेलें असतें, तसेंच तें एकएकट्या शब्दांतसुद्धां प्रतिबिंबित झालेलें असतें. परंतु मुक्तेश्वर, मोरोपंत इत्यादिकांच्या कृतींमधील कवित्वानें आपलें अंतःकरण जसें

प्रसन्न होतें तसें शब्दगत कवित्वानें कां होत नाहीं? भाषेमध्यें कवित्वगर्भ शब्द पुष्कळ असतात, व प्रत्येक कवित्वगर्भ शब्दांत कमी जास्ती प्रमाणानें किंवा कमी जास्ती मनोहर प्रमाणानें कवित्व संचित झालेलें असतें, तथापि ह्या कवित्वगर्भ शब्दांतील कवित्वाचा आस्वाद आपणास कां प्राप्त होत नाहीं? ह्या आस्वादाचें स्वारस्य आपणास प्राप्त न होण्याचीं दोन कारणें आहेत. एक तर ह्या शब्दगत कवित्वाचें अस्तित्वच आपणास अवगत नसतें. तें कवित्व कोणी तरी उकलून बाहेर काढून त्याची प्रतीति नजरेस आणून दिल्याखेरीज तें आपणास समजेल असें नसतें. आणि दुसरें कारण असें कीं, ते कवित्वगर्भ शब्द आपल्या नेहमींच्या परिपाठांतले असल्याकारणानें चिरपरिचितत्वाचा परिणाम त्यांच्यावर घडून येतो. उघडच आहे कीं, एकादी वस्तु कितीही सुंदर असली तरी ती नेहमीं आपल्या डोळ्यापुढें असल्याकारणानें तिच्याविषयींचा आदर आपल्या मनांतून नाहींसा होतो, किंवा निदान कमी तरी होतो, आणि त्या सुंदर वस्तूच्या प्राथमिक अवलोकनानें होणाऱ्या आनंदाचा तीव्रपणा व मोहकपणा हीं कालांतरानें नष्ट होतात, किंवा कमी होतात. शब्दगत कवित्वाकडे आपलें लक्ष्य गेलेलें नसलें, किंवा त्याचे विषयींचा आदर आपल्या मनांतून नष्ट झालेला असला, तरी त्या शब्दांत कवित्व नाहीं, किंवा कवित्व नष्ट झालें, असें म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु उलट पक्षीं असेंही म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं कीं, खरी सहृदयता ज्यास आहे त्यास अशा कवित्वगर्भ शब्दांपासून अधिक अधिकच आनंद होत जातो. एका कवीनें म्हटलें आहे:—

प्रतिक्षणं यन्नवतामुपैति
तदेव रूपं रमणीयतायाः॥

शब्दांतर्गत जें रमणीय कवित्व तेंही सहृदय पुरुषाच्या मनश्चक्षूस प्रतिक्षणीं नवीन नवीन असें वाटतें. याप्रमाणें काव्य व कवित्व ह्यांच्या स्वरूपाचा निर्देश करून आम्ही कवित्वगर्भ शब्दांतील कवित्वाच्या उद्घाटनाकडे वळतों.

**१. वाचणें.**—वाचणें हा शब्द आपण दिवसांतून शेकडों वेळां उच्चारतों. परंतु त्या शब्दांतील कवित्वाची कल्पना फार थोड्यांसच असेल. संस्कृत भाषेमध्यें वच् ह्या धातूचा अर्थ बोलणें असा आहे. त्यापासून वाचय् असें प्रयोजक रूप होऊन त्याचा अर्थ बोलविणें, वदविणें, बोलावयास लावणें असा होतो. वाचय् या संस्कृत धातूचा अपभ्रंश मराठींत वाच असा झाला आहे. अक्षरांच्या योगानें आपल्या मनांतील विचार प्रकट करण्याची उपयुक्त व विलक्षण कल्पना जेव्हां आपल्या पूर्वजांस माहीत झाली, तेव्हां त्यांना जें आश्चर्य व आनंद हीं वाटलीं तीं या शब्दांत स्पष्ट दिसत आहेत. झाडाच्या सालीसारखा एखादा निर्जीव पदार्थ, मनुष्यांच्या मनांतील विचार मुखानें स्पष्ट बोलून दाखविल्याप्रमाणें प्रकट करतो असें पाहून त्या निर्जीव पदार्थावर सजीवत्वाचा आरोप करून त्याचे ठायीं बोलण्याचें सामर्थ्य आहे अशी कल्पना लोकांनीं करणें हें अत्यंत साहजिकच आहे. ही कल्पना किती मनोरम आहे बरें? आपण आपल्या मित्राचें पत्र वाचतों तेव्हां काय करतों? आपल्या मित्राच्या मनांतील भाव कागदास बोलून दाखवावयास लावतों. आणि ही कामगिरी कागद किती चोखपणानें व इमानानें बजावतो हेंही आपणास ठाऊकच आहे. प्रत्यक्ष मनुष्य तोंडानें शब्द उच्चारून जे विचार बोलून दाखवितो तेच विचार तंतोतंत रीतीनें निर्जीव कागद प्रकट करतो. मुंडक्यास जादूगार लोक बोलवितांना

पाहून आपणास जसें आश्चर्य व कौतुक वाटतें, त्याप्रमाणेंच आपल्या पूर्वजांस लेखनकलेच्या उत्पत्तिसमयीं पत्रांदिकांची विचार प्रकट करण्याची अद्‌भूत शक्ति पाहून आश्चर्य व कौतुक वाटलीं असावीं. दक्षिण महासागरांतील एका बेटांत राहणाऱ्या एका मनुष्यास विल्यम्स् ह्या नांवाच्या पाद्यानें जो लांकडाचा ढलपा दिला त्यानें त्याच्या बायकोस " गुण्या पाठवून द्यावा " हा मजकूर कळविला हें पाहून त्या आश्चर्यचकित रानटी मनुष्याचा उद्गार निघाला, " काय! ढलपे देखील बोलते करतां येतात काय?" अशा प्रकारचें आश्चर्य आपल्या पूर्वजांस वाटून त्यांनीं वाचय् असें नांव ह्या वाचण्याच्या क्रियेस दिलें. आनंद व आश्चर्य ह्या मनोविकारांनीं हृदयास उचंबळा आणून निर्जीव पदार्थांचे ठायीं सजीवत्वाचा साहजिक रीत्या आरोप करविणारी जी शक्ति तेंच कवित्व होय असें जर आपण कबूल करतों, तर वाचय् हा शब्द ज्या पुरुषानें प्रथम योजला त्याचे ठायीं कवित्व नव्हतें असें आपणास म्हणवेल काय? त्याणें एका लहानशा शब्दामध्यें केवढें कवित्व दाखविलें आहे?

**२. भांगाचें पाणी.**—कोंकणामध्यें अष्टमीच्या भरतीस भांगाचें पाणी असें म्हणतात. समुद्रास भरती ओहोटी होतात त्या चंद्रसूर्यांच्या आकर्षणामुळें होतात, हें ज्योतिषशास्त्र जाणणाऱ्यांस ठाऊक आहे. पौर्णिमेस व अमावास्येस जी भरती येते ती नेहमींपेक्षां मोठी असते. कारण चंद्र व सूर्य ह्या दोघांच्याही आकर्षणशक्तीचा परिणाम पाण्यावर एकाच रेषेंत घडत असतो. परंतु अष्टमीच्या दिवशीं चंद्र व सूर्य ह्यांच्या आकर्षणरेषा एकमेकींवर लंब असल्यामुळें चंद्राच्या आकर्षणाचा जोर सूर्य कमी करतो व सूर्याच्या आकर्षणाचा जोर चंद्र कमी

करतो, ह्यामुळें पाणी अगदीं खोल जातें व लाटांचा जोरही कमी होतो. अशा पाण्यास भांगाचें पाणी म्हणतात, आणि हा शब्द यथायोग्य आहे. स्त्री आपले विखुरलेले केश फणीनें विंचरून कांहीं उजवीकडे व कांहीं डावीकडे असे साफसुफी करून बसविते आणि ते केश उडेनातसे करिते, व मधोमध भांग राखते. त्याप्रमाणें अष्टमीचे दिवशीं समुद्राच्या पाण्याचा कांहीं भाग एकीकडे व कांहीं भाग दुसरीकडे केला जाऊन सर्व पृष्ठभाग शांत होतो. ह्या पाण्याच्या स्थितीस भांगाची उपमा किती अनुरूप आहे! ही उपमा ज्यानें प्रथम दिली तो कवि होता हें स्पष्ट आहे. कारण वसुंधरेचेठायीं स्त्रीत्वाचा आरोप करणें, तिचे वरील कृष्णवर्ण जलाच्या लाटांस केशांची उपमा देणें, तिचे केश विंचरण्यास अर्द्धवर्तुलाकृति चंद्र हीच प्रसाधनपट्ट फणी अशी कल्पना करणें, त्या फणीनें कांहीं जलौघ एकीकडे व कांहीं दुसरीकडे केला जात आहे असें कल्पिणें, आणि अशा रीतीनें भूमिरूप स्त्रीच्या मस्तकावरील वाऱ्यानें विखुरलेले वीचिरूप केश चापून चोपून साफ केले जात आहेत अशी सृष्टिशास्त्रास अविरुद्ध अशी कल्पना करणें, हे बुद्धीचे कांहीं लहान सहान व्यापार आहेत काय? ह्या भव्य व प्रचंड कल्पना ज्याणें भांगाचें पाणी ह्या शब्दांत गोवून ठेविल्या त्याच्या बुद्धीचें सामर्थ्य व विशाळता हीं केवढीं असलीं पाहिजेत? समग्र पृथ्वीचा विस्तार, तिच्या पृष्ठभागावरील विस्तीर्ण जलसंचय, त्या जलसंचयावर सूर्य आणि चंद्र ह्या दोन तेजस्वी गोलांचा परिणाम हीं ज्या पुरुषानें आपल्या विशाळ व समर्थ बुद्धीनें ग्रहण केलीं, व ज्यानें भूमीवर स्त्रीत्वाचा, जळावर केशांचा, अर्धवर्तुळाकृति चंद्रावर फणीचा, आणि दोन बाजूंस होणाऱ्या जलौघांवर कानाशिलांचा आरोप केला, त्या पुरुषाच्या बुद्धीचा पोंच

आणि कवित्वाचें गांभिर्य हीं केवढीं असावीं? त्या पुरुषाचेठायीं कवित्व नव्हतें असें कोण म्हणेल?

एखाद्या लाक्षणिक शब्दाचा पूर्ण अर्थ जाणावयाचा असल्यास, आपण त्याच्या मूळच्या अर्थाचें नीट मनन करून त्या अर्थाचा नकाशा आपल्या चर्मचक्षूनें किंवा अंतश्चक्षूनें पाहण्याचा प्रयत्न करावा, म्हणजे त्या शब्दाचा जोरदार अर्थ आपल्या मनावर चांगला ठसतो. शब्दांच्या उत्पत्तीचा चांगला अभ्यास करून प्रत्येक शब्दास हल्लींचा अर्थ कसा प्राप्त झाला हें आपण लक्षपूर्वक पाहूं लागलों, तर शब्द व त्यांचे अर्थ हे आपल्या मनांत चांगले ठसतील; आणि तेणेंकरून अनमानधबक्यानें, अनिश्चितपणानें व अस्पष्ट रीतीनें शब्दांचा अर्थ करण्याची वाईट चाल नाहींशी होईल. तसेंच त्यापासून भाषणांत व लिहिण्यांत योग्य प्रसंगीं योग्य शब्द घालण्याची संवय लागेल व भाषा ही सोनें जोखावयाच्या तराजूप्रमाणें सूक्ष्म भेद दाखविण्यास समर्थ होईल. शब्दाच्या हल्लींच्या अर्थाचा मूळच्या अर्थाशीं कोणच्या प्रकारचा संबंध आहे हें जाणण्याचा प्रयत्न केल्यापासून आपल्या मनांतील विचारांचा अस्पष्टपणा नाहींसा होऊन त्यांस स्पष्टपणा कसा येतो हें दाखविण्यासाठीं आम्ही एक उदाहरण घेतों.

**३. उडाणटप्पू.**—उडाणटप्पू हा शब्द सर्वांस ठाऊक आहे. त्याचा अर्थही सर्वांस ठाऊकच आहे. जो कोणी एका विषयावर फार वेळ गुंतून न राहतां एकावरून दुसऱ्यावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर जातो तो, अस्थिर, चंचळ, हातीं घेतलेलें कोणतेंही काम पुरतेपणीं करीत नाहीं तो, असा अर्थ उडाणटप्पू याचा आहे. परंतु ह्या शब्दाची व्याप्ति स्पष्टपणें दाखविणाऱ्या मर्यादरेषा आमच्या वाचकांस ठाऊक आहेत काय? कदाचित नसतील. मोलस्वर्थनें ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं ‘उडाणटप्पू

हा शब्द उडणें ह्याची हेंगाडी द्विरुक्ति आहे ( a light formation from उडणें )' असा शेरा दिला आहे. ह्यावरून ह्या कोशकारास उडाणटप्पू या शब्दाची व्युत्पत्ति कळली नव्हती व त्याला त्याच्या अर्थाचाही स्पष्टपणें बोध झाला नव्हता असें म्हणणें भाग आहे. ह्या शब्दाची खरी व्युत्पत्ति उड्डीन तट्टू ( उड्या मारणारा तट्टू ) अशी आहे. उडाणटप्पू हा शब्द उड्या मारणाऱ्या तट्टाच्या साम्यावरून उत्पन्न झाला आहे असें एकदा आपणास समजलें, म्हणजे त्या शब्दाच्या अर्थाची स्पष्ट व कधींही नाहींशी न होणारी कल्पना आपल्या मनांत येते. आपणापैकीं पुष्कळांनीं शिंगरास फेरफटका करण्यासाठीं मोकळें केलें असेल. मोकळें झालेलें शिंगरू क्षणभर तरी एके ठिकाणीं स्थिर राहतें काय? तें टणाटण उड्या मारतें, एकदम इकडून तिकडे वळतें, मानेला हांसडे देतें, दहा पावलें धांवत जाऊन पुन्हा एकदम आपली दिशा बदलतें, परत येतें, किंवा पुन्हा दुसरीकडे भरारी मारतें. हे अनेक अस्थिरपणाचे चाळे डोळ्यांनीं पाहिले किंवा मनांत आणले म्हणजे उडाणटप्पू या शब्दाचा अर्थ किती स्पष्टपणें रेखला जातो? आणि अशा रीतीनें ह्या शब्दाचा अर्थ मनांत ठसवून घेणें, हें लाभप्रद नाहीं काय? त्या शब्दांतील आरोपमूलक साम्य किती मनोहर कवित्व प्रकट करतें? शब्दाच्या व्युत्पत्तीचा अशा प्रकारें अभ्यास केल्यानें त्यांचे अर्थ आपणास स्पष्ट समजतात, इतकेंच नव्हे तर कधीं कधीं शब्दांतील कवित्व किंवा नीति किंवा इतिहास किंवा दुसरी हरएक प्रकारची माहितीसुद्धां आपणास मिळते.*

* ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल मतभेद आहे. मोलस्वर्थनें दिलेली व्युत्पत्ति वर नमूद केलेलीच आहे. आमचें मत उड्डीन तट्टू हीच व्युत्पत्ति

**४. अजागळ.**—अजागळ हाही शब्द मोठ्या चमत्कारिक रीतीनें उत्पन्न झाला आहे. त्याचा अर्थ निरुपयोगी, बेअकली, मूर्ख मनुष्य असा आहे. संस्कृतांत एक सुभाषित श्लोक आहे.

**धर्मार्थकाममोक्षाणां यस्यैकोऽपि न विद्यते ।**
**अजागलस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम् ॥**

शेळीच्या गळ्यांत लटकत असलेले स्तन निरुपयोगी, बेडौल असे असतात. त्यावरून निरुपयोगी व बेअकली मनुष्यावर अजागलस्तनत्वाचा जोरदार आरोप केला जाऊन, तशा मनुष्याला अजागल म्हणण्याचा परिपाठ पडला. हा शब्द प्रथम संस्कृतज्ञांनीं रूढ केला. पुढें तो आपल्या अंगच्या जोरदारपणामुळें सर्वतोमुखीं झाला. तेव्हां मूळचा शब्दार्थ लोकांस न समजल्यामुळें अजागलस्तन ह्यांतील शेवटचीं दोन अक्षरें गळून जाऊन त्यास अजागळ असें आटपसर रूप प्राप्त झालें. अजागल शब्दाची ही व्युत्पत्ति समजली असतां, त्या शब्दाचा जोरदारपणा किती स्पष्ट रीतीनें मनावर ठसतो?

---

खरी असावी असें आहे. कारण "चुकारतट्टू" हा "उडाणटप्पू" ह्याशीं बहुतांशीं समानार्थक शब्द असून तट्टाच्या अस्थिरपणावरून त्याची प्राणप्रतिष्ठा झालेली आहे. दुसरें असें कीं "उडाणटप्पू" ह्या शब्दाच्या अर्थाच्या घटक कल्पना वेगळ्या करून उडता तट्टू, उडणारा तट्टू वगैरे सारखे प्रयोग अस्थिर मनुष्याच्या संबंधानें केले जातात. आतां तचा ट कसा झाला हें सांगणें राहिलें. मूर्द्धस्थानचा "ण" अगोदर उच्चारून नंतर दन्त्य "त" उच्चारण्यास जिव्हेस कठिण पडून संध्वाननाच्या (assimilation) नियमाप्रमाणें "त" चा "ट" झाला. परंतु एका "ट"च्या पुढें आणखी दोन "ट" उच्चारणें हा कर्कश ध्वनि असल्याकारणानें विध्वाननाच्या नियमास अनुसरून "ट्टू" चा "प्पू" झाला. संध्वानन व विध्वानन ह्यांचे व्यापारांचीं उदाहरणें सर्व भाषांमध्यें विपुल आढळतात.

५. **गयाळ.**—गयाळ हा शब्द अजागळ ह्यापासून विलोमानें झाला असें कै० वा० विष्णु कृष्ण चिपळूणकर यांचें मत आहे. गयाळ हा शब्द अजागळ शब्दापेक्षां अधिक जोरदार व अधिक निंदाव्यंजक आहे.*

६. **लाजाळू.**—पुष्कळ वनस्पतींचीं नांवें कवित्वगर्भ आहेत. शिबिकाकुल म्हणून वनस्पतींचा एक वर्ग आहे. त्यांत **लाजाळू** हें झाड आहे. लाजाळू हें झाड आमच्या वाचकांपैकीं बहुतेकांनीं पाहिलेंच असेल. ह्या झाडास लाजाळू हें नांव किती अन्वर्थक आहे बरें? नवी नवरी घराच्या एकाद्या कोंपऱ्यांत बसलेली असते. कोणी वडील माणूस जवळ आल्याबरोबर ती आपली मान वांकविते. आपलें अव्याज मनोहर असें तोंड खालीं घालते आणि तें वडील माणूस दूर जाऊं लागलें म्हणजे हळू हळू तोंड वर करून आपली "त्रस्तैकहायनकुरंगविलोलदृष्टी" इकडे तिकडे फेंकते. असेंच वर्तन लाजाळूचें असतें. कोणी मनुष्य जवळ आला असतां ती कावऱ्याबावऱ्यासारखी चळवळ करते. तिला कोणी हस्तस्पर्श केला तर नम्रपणानें अधोमुख होऊन, आपल्या नाजूक व बारीक शाखा खालीं पाडते, आणि अत्यंत शालीनतेची मुद्रा दाखविते. ज्या पुरुषाच्या पाणिपीडनानें तिला अस्वस्थता प्राप्त झालेली असते, तो दूर गेल्यावर ती हळू हळू आपलीं गोजिरवाणीं पानें

---

* कित्येक विद्वान ह्या शब्दाची उत्पत्ति गयावळ लोकांपासून झाली आहे असें समजतात. "गयाळ" हा शब्द कोंकणांत पडीत किंवा निरुपयोगी जमीनीस लावतात. अशा जमीनीचें मूर्ख मनुष्याशीं तादात्म्य सहज रीत्या केलें जाऊन मूर्ख मनुष्याच्या संबंधानें "गयाळ" शब्द योजला जाऊं लागला असावा ही कल्पना आम्हास अधिक सयुक्तिक दिसते.

उघडते, टवटवीत चिमुकल्या शाखा उभारते, आणि पुन्हा प्रसन्न मुद्रेनें पर्यंतभागच्या उपवनप्रदेशास शोभवूं लागते. ह्या वनस्पतीच्या अशा शालीन वर्तनावरून तिचें " लाजाळू " असें नांव ज्यानें ठेविलें, त्यानें नवोढेशीं तिचें सादृश्य कसें चटकदार रीतीनें वर्णिलें आहे? नवोढेची मुख्य खूण लाजणें ही होय. आपल्या बायका भित्र्या मुलांस नेहमीं म्हणतात, " असा नव्या नवरीसारखा लाजतोस काय? "

**७. नमस्कारी.**—ह्याच वनस्पतीस संस्कृतांत **नमस्कारी** असें नांव आहे. हें देखील कवित्वगर्भच आहे. नमस्कार करतेवेळीं ज्याप्रमाणें आपण दोन हात जुळवून अजलि करून खालीं वांकतों, त्याप्रमाणें ही वनस्पति आपलीं लहान लहान पानें दोन बाजूंनीं आणून जुळविते, आणि शाखा वांकविते, तेणेंकरून ती जणों काय नमस्कार करीत आहे असा भास होतो. उद्धट, द्वाड, भयंकर अशा निवडुंगाच्या झाडाप्रमाणें ही लाजाळू बेपर्वाई व मगरुरी दाखवीत नाहीं, तर उलटपक्षीं नम्रपणा दाखविते. ह्या तिच्या शालीन आचरणावरून तिच्याठायीं सचेतनत्वाचा आरोप करून अति गोड नांव नमस्कारी असें ज्याणें दिलें त्याणें ह्या नांवामध्यें बरेंच कवित्व व्यक्त केलें आहे. पुष्कळ वनस्पतींचे वाचक शब्द त्या त्या वनस्पतीचे, गुण, धर्म, आकार, स्वरूप इत्यादिकांची माहिती करून देणारे असतात.

**८. दिपमाळ.**—तुलसीकुलामध्यें दिपमाळ म्हणून एक झाड आहे. तें पुष्कळांनीं पाहिलेलें असेल. त्याला असें नांव पडण्याचें कारण हें कीं, देवळासमोरील दिपमाळेशीं ह्या झाडाच्या मंजरीचें साम्य आहे. देवळासमोरील दिपमाळ उंच व निमूळती असून सभोंवार चक्राकार ( दिवे ठेवण्यासाठीं ) लहान लहान पायऱ्यांच्या आकाराचे दगड असतात. त्याचप्र-

माणें सदरहू झाडाची मंजरी असते. ती उंच व निमूळती असून, तिच्या पुष्पदंडावर चक्राकार फुलें असतात व तेणेंकरून ती मंजरी हूबेहुब देवळासमोरच्या दिपमाळेप्रमाणें दिसते. ह्या साम्यावरून त्या झाडास दिपमाळ असें नांव पडलें आहे. दिपमाळ हें झाडाचें नांव चारुतामूलक साम्यावरून त्यास प्राप्त झालेलें असल्यामुळें तें कवित्वगर्भ होय.

९. **पादप**.—पादप हा शब्द वनस्पतीचा सामान्येंकरून वाचक आहे. त्याचा अर्थ पायांनीं पुष्टि पिऊन घेणारा असा आहे. वनस्पतीच्या अंगांत जीं घटक द्रव्यें असतात, त्यांपैकीं बराच भाग मुळांच्या द्वारें वर चढतो हें प्रसिद्धच आहे.

१०. **न्यग्रोध**.—वडाला न्यग्रोध असें नांव आहे. त्या झाडाची वाढ व विस्तार वरच्या दिशेनें शाखा, पर्णें ह्यांच्यां रूपानें होतो, तसा खालच्याही बाजूनें पारंब्यांच्या रूपानें होतो, हें प्रसिद्धच आहे. ह्या पारंब्या, शाखा, पर्णादिकांप्रमाणें स्तंभाचे अवयव नसून, तीं आगंतुक मूलें होत. परंतु ह्या पारंब्या जमिनींत शिरल्यावर स्तंभाप्रमाणेंच दिसतात. ह्यावरून न्यग्रोध हा शब्द उत्पन्न झालेला आहे. अर्थात् ह्या शब्दाची खुमारी लक्ष्यांत बाळगण्याजोगी आहे. त्याचप्रमाणें दुपारी, सायंकाळी, तिरसंगी (त्रिसंन्ध्य), सदाफुली, बारामासी हेही शब्द त्या त्या वनस्पतींचें स्वरूप दाखवितात.

११. **अक्षि**.—संस्कृतांत कवडीला आक्षिन् असें म्हणतात. हें नांव डोळ्याच्या साम्यावरून कवडीस पडलेलें आहे. कवडीच्या पाठीवर डोळ्याच्या आकृतीची पिवळी रेषा असते, ती सर्वांनीं पाहिलीच आहे. ही रेषा हुबेहुब डोळ्याच्या आकृतीप्रमाणें असते. डोळ्यांचीं अपांगें, वरचा उंच व गोल भाग, खालचा किंचित चपटा गोल भाग, नाकाच्या समीपचा कोपरा, बुबुळाचा

उंचवटा वगैरेचें कवडीच्या आकृतीशीं विलक्षण साम्य आहे. ह्या साम्यावरून कवडीस अक्षि हें नांव प्राप्त झालें. हें साम्य इतकें पूर्ण आहे कीं, ज्यानें प्रथम कवडी पाहिली त्यास त्या पदार्थास डोळ्याचें वाचक अक्षिन् हें नांव देणें अगदीं साहजिक वाटलें असावें.

**१२. माधुकरी.**—खरकट्या व सोंवळ्या अन्नाची भिक्षा मागणाऱ्या मुलांस माधुकरी असें म्हणतात. हा शब्द संस्कृत मधुकर ( भ्रमर ) ह्या शब्दापासून झालेला आहे. मधुकर ज्याप्रमाणें एका फुलावरून उडून दुसऱ्या फुलावर जातात, दुसऱ्यावरून तिसऱ्यावर जातात व प्रत्येक फुलांतून गोड मधाचें ग्रहण करितात, त्याप्रमाणें हे माधुकरी मुलगे प्रत्येक घरांतून थोडथोडें अन्न ग्रहण करीत करीत आपल्याला पुरे इतकें अन्न जमवितात. एथें माधुकरी मुलांच्या वृत्तीचें भ्रमरांच्या वृत्तीशीं किती जोरदार रीतीनें साम्य वर्णिलेलें आहे ?

**१३. गुलजार.**—गुलजार हें विशेषण आपण नाजूक, कोमल व रमणीय अशा वस्तूंस लावतों. उदाहरणः—ह्या मुलाचा चेहरा किती गुलजार आहे! ह्या पुस्तकाची बांधणी किती गुलजार आहे! गुलजार हा शब्द वर्णांनीं जसा मधुर आहे, तसा तो अर्थानेंही आहे; व त्याचा अर्थ जसा मधुर आहे तसेंच त्यांतील कवित्वही मधुर आहे. हा शब्द फारसींतील असून त्याचा अर्थ "फुलांचा ताटवा" असा आहे. फुलांचा ताटवा पाहून कोणाचें चित्त रमत नाहीं ? प्रपंचांतील अडचणींचा कोणास विसर पडत नाहीं ? किती रमणीयता, किती कोमलता, किती मधुरता, एकट्या फूल या शब्दानें मनांत येते ? आणि हृदयंगम वस्तूस फुलांचा ताटवा म्हणणें हें किती नाजूक कवित्वाचें व्यंजक आहे ? गुलाब हाही फारसी शब्द असून त्याचा अर्थ

त्या भाषेंत पुष्पाचा रस असा आहे. गुलाबाच्या फुलाचा सौम्य वास व साधें परंतु रमणीय स्वरूप मनांत आणलें असतां त्या फुलास हें नांव किती योग्य आहे हें वाचकांचे नजरेस येईल.

**१४. अश्वधाटी.**—छंदःशास्त्रांत अश्वधाटी म्हणून एक वृत्त आहे. त्याचे चार चरण असून प्रत्येकांत बावीस अक्षरें असतात; चरणांची मोडणी अशी असते कीं, सात तगण असून शेवटीं एक गुरु अक्षर असतें. यति ४, ६, ६, ६, या अक्षरांच्या शेवटीं पडतात. या वृत्ताचें एक उदाहरण देतों:—

**वाचाळ मी नीट पाचारितों धीट याचा नयो वीट साचा हरी ॥**
**खोटा जरी मी चखोटामधें तूंचि मोठा, कृपेचा न तोटा घरीं ॥**
**दाता सुखाचा सदा तारिता आपदा ताप हे एकदा तापटीं ॥**
**या संतसेवाव्हया संपदा दे भयासंग नाशील या संकटीं ॥**

हें वृत्त जर कोणी योग्य स्थळीं यति देऊन म्हटलें तर तें ऐकणारास घोड्याच्या एक प्रकारच्या चालीची आठवण होईल. घोडा समारंभाच्या प्रसंगीं दुडक्या चालीवर चालत असतां ज्याप्रमाणें त्याच्या टापांचा आवाज निघतो त्याच प्रमाणें हें वृत्त म्हणत असतांना आवाज निघतो. ह्या वृत्तास ज्या कोणी अश्वधाटी असें नांव दिलें, त्यानें अश्वाच्या चालीशीं ह्या वृत्ताचें सादृश्य ठरवून आपल्या उच्छृंखळ कल्पनाशक्तीला बरेच विलास करूं दिले ह्यांत शंका नाहीं.

**१५. त्रेसष्टी व छत्तिशी.**—नवराबायकोमध्यें प्रेम असल्यास त्यांच्यांत त्रेसष्टी आहे असें म्हणतात. व त्यांच्यांत प्रेम नसल्यास छत्तिशी आहे असें म्हणतात; प्रेम आणि प्रेमाभाव ह्यांस अनुक्रमें त्रेसष्टी आणि छत्तिशी हीं नांवें कशीं रुजू झालीं हें वाचकांस सहज कळून येण्याजोगें आहे. आपण त्रेसष्टाचा आंकडा ६ ३ असा काढतों, आणि सहा आणि तीन ह्या अंकांच्या आकृति

परस्परांकडे तोंडें करून बसलेल्या माणसांप्रमाणें दिसतात. याप्रमाणें त्रेसष्टी म्हणजे प्रेम या शब्दाची उत्पत्ति उघड आहे. तसेंच छत्तिसाचा आंकडा आपण ३६ असा काढतों, एथें तीन व सहा या अंकांच्या आकृति एकमेकांकडे पाठ करून बसलेल्या माणसांप्रमाणें दिसतात. नवऱ्याचें तोंड पूर्वेकडे आणि बायकोचें पश्चिमेकडे अशी स्थिति असली म्हणजे त्यांच्यांत छत्तिशी आहे असें म्हणतात, आणि तें साहजिकच आहे. शुद्ध यदृच्छेवर ज्या आकृति अवलंबून आहेत, त्यांच्या पायांवरसुद्धां उपमेची प्रतिष्ठापना करावयास आपण सोडीत नाहीं, याचीं त्रेसष्टी व छत्तिशी हे शब्द चांगलीं उदाहरणें आहेत. तिहींच्या अंकाची आकृति जर नवाप्रमाणें किंवा दुसऱ्या एकाद्या अंकाप्रमाणें काढावयाची आपली चाल असती तर त्रेसष्टी व छत्तिशी हे शब्द प्रेम व प्रेमाभाव यांचे द्योतक झाले नसते हें उघड आहे. तथापि या शब्दांची उत्पत्ति ज्या अर्थी साम्यावर अवलंबून आहे आणि ज्या अर्थी हें साम्य मोठें मजेदार आहे त्या अर्थी हे शब्द कवित्वमूलक आहेत यांत शंका नाहीं.

**१६. चोहोंचा आंकडा.**—सुखासीन मनुष्याचे मांडीस चोहोंचा आंकडा म्हणतात. हा शब्दही कवित्वगर्भ आहे. आसनमांडी घालून बसलेल्या मनुष्याच्या पायांची मोडणी चोहोंच्या (चार) आंकड्याप्रमाणें असते.

**१७. अर्धचंद्र.**—अर्धचंद्र देणें म्हणजे गचांडी मारून हाकलून देणें. गचांडी देतांना आंगठा व पुढचें बोट हीं एकमेकांपासून लांब करून मधील बेचांगळी ताणतात. तेव्हां हा मधला भाग अर्धचंद्राच्या आकाराचा होतो. यावरून गचांडीस अर्धचंद्र असें सौम्य नांव मिळालें.

**१८. कंगाल.**—ह्या शब्दाचा आपण गरीब, दरिद्री ह्या अर्थी उपयोग करतों. परंतु संस्कृतानभिज्ञ लोकांस त्याच्या या अर्थांतील जोरदारपणा समजण्याजोगा नाहीं. गरीब, दरिद्री मनुष्याच्या शरीराची स्थिति कशी असते हें आपणास ठाऊक आहे. खावयास प्यावयास न मिळाल्याकारणानें त्याचे डोळे खोल कोनाड्यांत ठेवल्याप्रमाणें दिसतात. गाल इतके खोल गेलेले असतात कीं, ते आहेत किंवा नाहींत याची शंकाच पडावी. पोट बखाडीस गेलेलें, हातापायांच्या काड्या झालेल्या, निस्तेज त्वचा इत्यादिकांच्या योगानें याचें शरीर हें वैद्यकी विद्यालयांत ठेवलेल्या हाडांच्या सांगाड्याप्रमाणें दिसत असतें. दारिद्र्याचा हा परिणाम नेहमीं दृष्टीस पडत असल्याकारणानें दरिद्री मनुष्यास, हा कंगाल आहे, असें म्हणण्याचा परिपाठ पडला. कंगाल म्हणजे अस्थिपंजर. पुढें कार्यकारणांच्या साततिक साहचर्यावरून कंगाल हा शब्द दरिद्री ह्या अर्थाचा वाचक झाला. कंगाल शब्दाचा मूळचा अर्थ मनांत आणला असतां दारिद्र्याचें किती जोरदार, किती ठसठशीत किती हृदयद्रावक चित्र आपल्या डोळ्यापुढें उभें राहतें बरें!

**१९. अग्निमुख.**—उष्ण कटिबंधांतील रहिवाशांनीं गलिच्छपणा केल्यास त्यांस शिक्षा करण्याकरितां म्हणून सृष्टिकर्त्यानें एक अजब युक्ति केली आहे. त्यानें एक अति ओंगळ आणि हिडिस असा प्राणि उत्पन्न केला आहे. तो घराच्या सर्व भागांत व घरांतील प्रत्येक पदार्थांत आपलें वसतिस्थान करूं शकतो. पापी मनुष्यास मरणोत्तर भोगाव्या लागणाऱ्या ज्या यातना, म्हणजे तप्त लोहस्तंभाशीं बांधलें जाणें, जिवंत निखाऱ्यांवर चालणें, तापलेल्या धातूंचा रस पिणें, मळमूत्रादिकाच्या डोहांत वास करणें, असिधारांवर निजणें इत्यादि

त्या सर्व यातनांच्या दसपट पीडा हा लहान प्राणी क्षणोक्षणीं मनुष्यास देतो, व मरण येईल तर बरें होईल असें वाटवितो. तो प्राणी कोणचा असावा बरें? तो प्राणी ढेंकूण होय! या प्राण्यास संस्कृतांत अग्निमुख असें ज्याणें अन्वर्थक नांव दिलें, त्यानें किती तरी कवित्व प्रकट केलें आहे.

**२०. आब्रू**.—मागें आलेल्या सर्व शब्दांपेक्षां आब्रू ह्या शब्दांतील कवित्व अधिक रसाळ आहे. हा शब्द फारसी भाषेंतील आहे. ह्या शब्दानें दाखविला जाणारा नाजूक अर्थ दाखविणारा शब्द मराठींत नाहीं, म्हणून हा सोईचा शब्द आपण परभाषेंतून घेतला. सद् आणि असद् ह्यांच्यांतील भेद स्पष्टपणें मनांत आणून सद् जें आहे तदनुसार वर्तनक्रम किंवा तदनुसार वर्तनक्रम ठेवण्याकडे मनाची प्रवणता, असा आब्रू ह्या शब्दाचा अर्थ आहे. आतां ही येवढी लांब व्याख्या देऊन आब्रू ह्या शब्दाचा अर्थ स्पष्ट करण्याचा आम्ही प्रयत्न केला आहे, तरी ती व्याख्या पूर्ण आहे, असें आमचें आम्हासच वाटत नाहीं. तथापि ठोकळ मानानें ती बरोबर आहे असें धरून चाललें असतां विशेष हरकत नाहीं. आब्रू ह्याचा अवयवार्थ तोंडावरचें पाणी अथवा तजेला असा आहे. तजेल्याबद्दल पाणी हा शब्द जसा मराठींत मोत्याचें पाणी, हिऱ्याचें पाणी इत्यादि ठिकाणीं योजला जातो, किंवा इंग्रजींत water of a pearl or diamond इत्यादि ठिकाणीं योजला जातो, त्याप्रमाणेंच फारशींतही तो योजला जातो. यावरून चेहऱ्यावरचें पाणी म्हणजे चेहऱ्याचा तजेला असा आब्रू ह्याचा अर्थ आहे. पण व्याख्येंत सांगितलेला वर्तनक्रम किंवा प्रवणता ह्यांचा चेहऱ्यावरील पाण्याशीं संबंध काय? त्यांच्यांत कार्यकारणभावाचा संबंध आहे. ज्या मनुष्याचें आचरण अत्यंत शुद्ध आहे, ज्यानें कायावाचा-

मनेंकरून पाप कधींही केलें नाहीं त्याची मुद्रा सदैव प्रफुल्लित असावयाची. कोणी कांहीं बोलला किंवा कोणाविषयीं बोलला, तरी त्याला लज्जित होण्याचें कारण नाहीं. त्याचें अंतःकरण पवित्र व निर्मळ असल्याकारणानें त्याच्या तोंडावरील अकृत्रिम तजेला नाहींसा होण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारच्या शुद्ध अंतःकरणाचें व चेहऱ्यावरील तजेल्याचें साततिक साहचर्य असल्यामुळें कार्यवाचक शब्द कारणाबद्दल योजला जाणें हें अत्यंत साहजिक आहे. ज्या पुरुषानें निर्मळ अंतःकरणाच्या मनुष्याच्या चेहऱ्याचा न ढळणारा तजेला प्रथम अवलोकिला, व पापी मनुष्याच्या चेहऱ्यावरील तजेला क्षणोक्षणीं नाहींसा होत असलेला अवलोकिला, आणि शुद्धवर्तनक्रमाचें चेहऱ्याच्या तजेल्याशीं तादात्म्य करून सोडलें, त्यानें आब्रू ह्या शब्दानें किती सूक्ष्म निरीक्षण व कार्यकारणभावाच्या निकट संबंधाचें पूर्णग्रहण हीं द्योतित केलीं आहेत, व किती गंभीर परंतु कोमळ कवित्व प्रकट केलें आहे बरें?

एथवर केलेल्या कवित्वगर्भ शब्दांच्या उद्घाटनावरून वाचकांच्या नजरेस आलेंच असेल कीं, कवित्व हें जगांतील सर्व प्रकारच्या व्यवहारांत दृष्टीस पडतें. सामान्यतः ज्यास कवित्व म्हटलें जातें तें कांहीं विशिष्ट ग्रंथांत मात्र दृष्टीस पडतें. परंतु कवित्व ह्याचा खरा व विस्तृत अर्थ मनांत आणला असतां आपणास असें कबूल करावें लागेल कीं, कवित्व रोजच्या व्यवहारांत, शास्त्रांत व तत्वप्रतिपादनांत, वगैरे सर्व ठिकाणीं दृष्टीस पडतें. आणि हें कवित्व सर्वत्र ठिकाणीं दृष्टीस पडणारच. कारण मनुष्याचे मनोव्यापार व मनोविकार हीं जोंपर्यंत हल्लींच्याप्रमाणें राहतील तोंपर्यंत कवित्व त्याच्या अंगांत खिळून राहिलेलें असणारच. वर वर जरी विचार केला, तरी हें कवित्व किती

सर्वव्यापक आहे हें पाहून आपणाला आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.

कवित्वगर्भ शब्द हे भाषेला भूषणाप्रमाणें होत. प्रत्येक मनुष्य जरी कवि नसला तरी त्यास कवित्वाच्या रसाचा आस्वाद घेण्याची इच्छा असते, व हा आस्वाद घेण्याला तो समर्थही असतो. कारण कवित्वगर्भ शब्द प्रथम प्रचारांत आणण्याचें श्रेय जरी एकएकाच पुरुषाकडे असलें तरी त्या शब्दांचा भाषेंत स्वीकार केला जाऊन साधारण लोकांच्या साधारण व्यवहारांतसुद्धां तो योजला जातो, हें मनुष्याच्या मनाची कवित्वाचा आस्वाद घेण्याकडे बलवत्तर प्रवणता असते ह्याची साक्ष देतें.



# प्रकरण दुसरें.

## नीतिगर्भ शब्द.

मनुष्य प्राण्याचा चांगल्याकडे कल आहे काय? त्याला चांगलें आवडतें काय? चांगल्याविषयीं त्याच्या मनांत पूज्य-बुद्धि आहे काय? लोकांनीं चांगलें केलें तर त्याला संतोष होतो काय? त्याचें अंतःकरण पवित्र आहे काय? ह्या प्रश्नांचा उलगडा करावयास आपणास फार लांब जाणें नलगे. त्याच्या भाषेंतील शब्दांचें अवलोकन केलें म्हणजे पुरे आहे. चांगल्याची प्रशंसा करणारे, चांगल्याविषयीं आवड आणि पूज्यबुद्धि दाखविणारे शब्द भाषेमध्यें पुष्कळ असतात. आणि मनुष्य प्राणी जात्या चांगला आहे, हा सिद्धांत स्वीकारल्याविना वरच्या प्रकारचे शब्द भाषेमध्यें कसे आले, ह्याचा उलगडा पडावयाचा नाहीं. शब्दांची गरज नसतां शब्द कधीं उत्पन्न होऊं शकत नाहींत. जी वस्तु आपण कधीं पाहिली नाहीं, किंवा ऐकिली नाहीं, तिचा वाचक शब्द भाषेमध्यें कधीं असावयाचा नाहीं; आगगाड्या, तारायंत्रें वगैरे अर्वाचीन काळच्या कलांचे वाचक शब्द प्राचीन भाषांमध्यें आढळणें अशक्य आहे; अज्ञात वस्तूंचे वाचक शब्द अस्तित्वांत येणें अशक्य आहे. यावरून असें म्हणायास पाहिजे कीं, ज्या वस्तूंचे वाचक शब्द भाषेमध्यें आहेत, त्या वस्तु ती भाषा बोलणाऱ्या लोकांस खचित ठाऊक होत्या. आणि वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारचे चांगल्याविषयीं आदर, आवड वगैरे दाखविणारे शब्द जर भाषेमध्यें असतात तर मनुष्य प्राणी हा जात्या चांगला आहे, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. परंतु ह्या प्रश्नाची दुसरी बाजूही मनांत आणली पाहिजे.

मनुष्याचा वाईटाकडे कल नाहीं काय? मनुष्य वाईट गोष्टी करीत नाहीं काय? दुसऱ्यास पीडून तो सुखावत नाहीं काय? ह्याही प्रश्नांचा उलगडा करावयासाठीं आपणास फार लांब जाणें नलगे. आपण भाषेंतील शब्दांचें पुन्हा अवलोकन केलें म्हणजे पुरे आहे. भाषेमध्यें वाईटाचे वाचक जे शब्द आहेत, तेच मनुष्याची वाईटाकडे असलेली प्रवणता स्थापित करतात. कारण मनुष्याची जर वाईटाकडे प्रवणता नसती तर हे वाई-टाचे वाचक शब्द भाषेमध्यें कसे आले असते? मनुष्य प्राणी हा जर चांगलाही आहे आणि वाईटही आहे, त्याची चांगल्या-कडे प्रवणता आहे तशी वाईटाकडेही आहे, तर ह्या दोन्ही प्रकारचे शब्द भाषेमध्यें आढळणें हें साहजिकच आहे. भाषा ही स्वच्छ आरशाप्रमाणें आहे. तिच्यामध्यें ती बोलणाऱ्यांचा चांगले-पणा व वाईटपणा हे दोन्ही गुण प्रतिबिंबिलेले असणारच. एकाद्या मनुष्यापुढें आरसा धरला तर तो आरसा त्याच्या. शरीराचा वर्ण दाखवितो, मग तो मनुष्य कोळशाप्रमाणें काळा असो किंवा लिंबाप्रमाणें पीतगौर असो. आरसा शरीराचे सर्व भाग दाखवितो, मग ते सुरेख असोत किंवा बेढब असोत त्याचप्रमाणें मनुष्याची भाषा ही त्याच्या मनाचा एक प्रकारचा आरसाच होय. त्यामध्यें मनुष्याच्या मनाचे सद्भाग व असद्भाग ह्यांचें हुबेहुब चित्र रेखलेलें असतें. म्हणून एकाद्या भाषेचा पूर्ण-पणें व लक्ष्यपूर्वक अभ्यास केला असतां, ती भाषा बोलणाऱ्यांच्या मनाचें खरें स्वरूप आढळल्याविना प्रायः राहावयाचें नाहीं.

आम्ही वर म्हटलें आहे कीं, भाषेंत असलेल्या शब्दांवरून ती बोलणाऱ्यांच्या मनाचें खरें स्वरूप आपणास अवगत होतें, परंतु हें म्हणणें असावें तितकें व्यापक नाहीं. असेंही म्हणावयास कांहीं प्रत्यवाय नाहीं कीं, भाषेमध्यें नस-

लेल्या शब्दांवरूनसुद्धां ती बोलणाऱ्यांच्या मनाचें स्वरूप अवगत होतें. हें विधान करणें कांहीं अंशीं साहसाचें आहे, असें वाचकांस आपाततः वाटण्याचा जरी संभव आहे, तरी खोल विचार केला असतां त्यांची खात्री होईल कीं, शब्दांच्या अभावावरून वस्तूचा अभाव, किंवा तिची दुर्मिळता, किंवा तिची सार्वत्रिक विपुलता ( ती इतकी कीं तिचा अभाव म्हणजे काय ह्याची कल्पनासुद्धां लोकांस असूं नये ) ह्या गोष्टी सिद्ध होतात. आतां शब्दांच्या अभावावरून वस्तूंचा अभाव सिद्ध करतां येतो तसा सार्वत्रिक फैलावही सिद्ध करतां येतो. तर कोणच्या प्रसंगीं कोणचा सिद्धांत स्वीकारावयाचा ह्यासंबंधानें अडचण येण्याजोगती आहे खरी. तथापि मनुष्याच्या मनाच्या नैसर्गिक व्यापारांवर धोरण ठेविलें असतां, व त्या लोकांच्या दुसऱ्या विशिष्ट व्यापारांवर दृष्टि फेकली असतां ह्या अडचणीचें निरसन होण्याजोगें आहे. असो; भाषेंतील शब्दांवरून ती बोलणाऱ्यांच्या मनाचें स्वरूप आपणांस ठरवितां येण्याजोगें आहे, असें आपणास म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. मनुष्याच्या मनाच्या थोरवीची साक्ष त्याच्या भाषेंतील शब्द देतात, त्याचप्रमाणें त्याच्या मनाच्या नीचपणाचीही साक्ष शब्दच देतात.

मनुष्य सर्वदा सुखी असतो काय? किंवा तो सर्वदा दुःखी असतो काय? ह्याही प्रश्नांचा उलगडा भाषेंतील शब्दांच्या अवलोकनावरून होतो. सुख व सुखाच्या हरएक प्रकारचे वाचक शब्द भाषेंत आहेत, त्याचप्रमाणें दुःख व दुःखाचे हरएक प्रकार ह्यांचेही वाचक शब्द भाषेमध्यें तितकेच किंबहुना त्यांहूनही अधिक आहेत. हे शब्द काय दाखवितात? हे शब्द हें दाखवितात कीं, मनुष्यास सुख आहे, परंतु दुःखापासून तो मोकळा आहे असें नाहीं, तर त्यास दुःखही अनु-

भवावें लागतें. तसेंच सुखाचें त्याला वारें कधीं मिळावयाचें नाहीं, असेंही नाहीं. आपण कोशाचें कोणतेंही पान उघडलें तरी त्यांत कांहीं सुखाचे वाचक व कांहीं दुःखाचे वाचक असे दोन्ही प्रकारचे शब्द आढळतील. संसारांत ज्याप्रमाणें सुख आणि दुःख हीं एकमेकांपासून फारशीं दूर असतात असें नाहीं, त्याप्रमाणेंच तीं कोशाच्या प्रत्येक पानांत शब्दांच्या रूपानें असावयाचींच. मनुष्याच्या मनाचे धर्म व संसारांतील सुखें आणि दुःखें हीं शब्दांवरून प्रकट होतात, त्याप्रमाणें मनुष्याची प्रापंचिक उन्नति किंवा अवनति ह्याही भाषेंतील शब्दांवरून व्यक्त होतात. मनुष्याच्या स्थितीमध्यें जसा पालट पडतो तसा तो शब्दांच्या अर्थामध्येंही पडतो. म्हणजे मनुष्याची प्रापंचिक, मानसिक किंवा नैतिक स्थिति जर उन्नत झाली तर शब्दांचे अर्थही उन्नत होतात व ती स्थिति अवनत झाली तर शब्दांचे अर्थसुद्धां अवनत होतात. शब्द हे ज्याअर्थीं वस्तूंचीं श्रुतिगोचर चित्रें होत, त्याअर्थीं वस्तु उन्नत झाल्या असतां तीं चित्रें उन्नत स्वरूपाचीं अशीं समजलीं जावीं, हें अगदीं साहजिक आहे. तसेंच त्या वस्तु अवनत झाल्या असतां त्यांचीं चित्रें अवनत समजलीं जावीं, हेंही साहजिकच आहे. असो. आतां प्रथम शब्दांच्या अवनतीचीं कांहीं उदाहरणें देतों.

१. **बाणीवर येणें.**—अघळ पघळ बोलण्याचा व वादविवादाचा परिणाम मैत्रीची वृद्धि होणें, किंवा तत्वबोध होणें, असा अनुभवास येत नसून मैत्रीचा भंग, असत्य बोलण्याकडे निंद्य प्रवृत्ति व शिव्या देणें, असाच बहुतकरून अनुभवास येत असल्याकारणानें बाणीवर येणें ह्याचा अर्थ चिरडीस जाणें, टाकून बोलणें, त्रागा करण्यास प्रवृत्त होणें, असा झाला.

**२. साथी.**—मनुष्यांचा एकोपा झाला असतां त्यांचे हातून एकादें परोपकाराचें किंवा सार्वजनिक उपयोगाचें कृत्य न होतां दुसऱ्यास फसविणें, दुसऱ्यास पीडा देणें, हेच परिणाम अधिक वेळां होत असल्याकारणानें साथी या शब्दाचा पूर्वींचा बरोबर असणारा असा अर्थ नष्ट होऊन वाईट कृत्यांतील मदतनीस असा त्याचा अर्थ होणें हें साहजिकच आहे.

असो. तर मनुष्याच्या अवनत स्थितीमुळें अवनत झालेले शब्द मराठींत शेंकडों आहेत. आपणास असें आढळून येईल कीं, शब्दांच्या वाच्य वस्तूंस अवनति प्राप्त झाल्यावरून त्यांचे वाचक शब्दही पूर्वीं चांगल्या अर्थाचे किंवा उदासीन अर्थाचे असतां क्रमाक्रमानें अवनत झालेले आहेत. आपण उदाहरणासाठीं अशा प्रकारचे कांहीं शब्द घेऊं.

**३. कळवंतीण.**—हा शब्द कलावती शब्दाचा अपभ्रंश आहे. कलावती ह्याचा पूर्वींचा अर्थ नर्तन, वादन, गायन वगैरे कलांमध्यें प्रवीण अशी स्त्री, असा आहे. परंतु गायननर्तनाचा धंदा करणाऱ्या स्त्रियांच्या अंगीं साहजिकरीत्या येणाऱ्या बहुपुरुषसेवन, नीचजनसहवास वगैरे दुर्गुणांवरून कलावंतीण ह्याचा अर्थ परपुरुषलोभनार्थ प्रसाधनविधींत लक्ष देणारी स्त्री, वेश्या, किंवा धंद्याचे पांघरुणाखालीं परपुरुषसेवन करणारी, असा झाला आहे.

**४. उचल्या.**—भलत्याच ठिकाणीं पडलेला पदार्थ एकादा मनुष्य उचलतो, तेव्हां तो पदार्थ योग्य स्थळीं ठेवण्यापेक्षां किंवा ज्याचा त्यास देऊन टाकण्यापेक्षां, स्वतःच्या उपयोगाकरितां तो आपल्याच जवळ ठेवण्याकडे त्याची अधिक प्रवृत्ति झालेली पाहण्यांत येते. ह्या कारणानें उचल्या हा शब्द खिसेकापू किंवा हलक्या चोऱ्या करणारा ह्या अर्थाचा झाला.

५. **लांबविणें**.—उचल्या शब्दावरून लांबविणें ह्या शब्दाची आम्हास आठवण होते. ह्याचाही अर्थ चोरणें असा आहे. हा अर्थ त्या शब्दास कसा प्राप्त झाला हें अगदीं उघड आहे. एकादी वस्तु उचलून ती दूर घेऊन जाणारा मनुष्य बहुतकरून ती ज्याची त्यास देण्याच्या उद्देशानें घेऊन जात नाहीं; तर तिचा स्वतःच उपयोग करण्यासाठीं घेऊन जातो; ह्यावरून लांबविणें म्हणजे चोरून नेणें असा त्यास अर्थ प्राप्त झाला.*

६. **लाघवी**.—लाघवी ह्याचा प्राथमिक अर्थ कुशल असा असून पुढें दुसऱ्याचें मन संतुष्ट करण्याचे कामांत कुशल असा त्याचा आकुंचित अर्थ झाला. नंतर स्वाभिमानाविषयीं फिकीर न बाळगतां दुसऱ्यास संतुष्ट करण्यांत कुशल, हांजी हांजी करणारा, असा त्याचा निंदाव्यंजक अर्थ झाला.

७. **हांजी हांजी**.—वरील विवेचनांत योजलेल्या हांजी हांजी करणें ह्या शब्दाची तरी तशीच अवनति झालेली आहे. हांजी हांजी करणें म्हणजे होय महाराज, होय महाराज, असें म्हणणें. अर्थात धन्याची किंवा वरिष्ठाची इमानानें सेवाचाकरी करण्यांत तत्पर असणें, असा त्याचा पूर्वीचा अर्थ असून, हल्लीं त्यास निंद्य अर्थ प्राप्त झाला आहे.

८. **उच्छृंखल**.—उच्छृंखल ह्याचा अर्थ साखळीपासून मुक्त झालेला, स्वातंत्र्यसुख मिळविलेला, असा होता. परंतु ज्यास नवीनच स्वातंत्र्य प्राप्त झालेलें असतें त्याची गेल्या शतकांतील फ्रेंच लोकांप्रमाणें त्या स्वातंत्र्याचा कांहीं काळ दुरुपयोग करण्याकडे बहुतकरून प्रवृत्ति असते. ह्यावरून त्याचा

---

* इंग्रजींतील purloin हा शब्द वाचकांस आठवेलच. त्या शब्दाची व्युत्पत्ति 'दूर नेणें' ह्या अर्थाचीच आहे तो शब्द साक्षात फ्रेंचपासून व परंपरेनें लाटिनपासून आलेला आहे.

अर्थ जनलज्जा, मनोलज्जा वगैरे न बाळगणारा, वडिलांचा योग्य मान न ठेवणारा, असा झाला. हा त्या शब्दाचा निंदाव्यंजक अर्थ संस्कृतांतही आढळतो; तो अलीकडचा आहे असें नव्हे.

९. **उर्मट.**–उन्मत्त ह्याचा संस्कृतांतील अर्थ शरीरविषयक व मनोविषयक असा दोहों प्रकारचा असून त्याच शब्दापासून मराठींत आलेला उर्मट हा शब्द केवळ मनोविषयक मात्र उन्माद दाखवितो.

१०. **खोटें.**–कूट ह्याचा मूळचा अर्थ अगम्य, गहन, न समजण्याजोगा असा आहे. गहन विषय लोकांच्या पुढें विचार करण्यासाठीं मांडून त्यांचें मनोरंजन करण्यापेक्षां दुटप्पी व अतएव स्पष्ट न समजण्याजोगें बोलून आपलें निंद्य कर्म छपविण्याकडे मनुष्याचा कल अधिक वेळां दिसून येत असल्याकारणानें कूट यापासून निघालेल्या खोटें ह्या शब्दाचा अर्थ अवनत होऊन दुसऱ्यास फसविण्याच्या उद्देशानें सत्याचा अपलाप असा झाला.*

११. **वक्कल.**–वक्कल ह्या अरबी शब्दाचा अर्थ बायको, कुटुंब, खटलें असा असून मराठींत राख किंवा बाळगलेली रांड असा त्याचा अर्थ झाला आहे.

येथवर अवनत शब्दांचें सामान्य स्वरूप दाखवून तशा शब्दांचीं कांहीं उदाहरणें दिलीं. आतां ह्या अवनत शब्दांचे प्रकार किती आहेत हें सांगून त्यांच्या उत्पत्तीचीं कारणें कोणचीं ह्याचें विवेचन करतों.

---

* खोटें हा शब्द खवट शब्दापासून झाला असें कित्येक विद्वानांचें मत आहे. वे. शा. सं. गोविंद शंकर शास्त्री बापट ह्यांचे मतें खोटें हा शब्द संस्कृत कूट पासून झाला आहे. आम्हास हें दुसरें मत अधिक ग्राह्य वाटतें.

अवनत शब्द दोन प्रकारचे आहेत. ज्या शब्दांच्या अर्थांत कांहीं अवनति झालेली नसून जे केवळ विद्वानांच्या तोंडून नाहींसे होऊन अविद्वानांच्या तोंडीं येऊन बसले, ते शब्द एका वर्गांत येतात; व अर्थानें अवनत असे **शागीर्द, ब्राह्मण, मिस्कीन, वस्ताद** इत्यादि शब्द दुसऱ्या वर्गांत येतात. पहिल्या प्रकारच्या अवनतीचें **फळार** हें उत्तम उदाहरण आहे. फलाहार ह्या संस्कृत शब्दाचा फलार किंवा फळार असा प्रथम अपभ्रंश होऊन तो सर्वांच्या तोंडीं झाला. परंतु पुढें विलोमक्रियेनें ळ आणि र या अक्षरांची अदलाबदल होऊन फराळ असा आणखी अपभ्रंश झाला. फराळ हा शब्द मूळच्या स्वरूपापासून अधिक ढळलेला व अतएव अधिक अशुद्ध आहे, व फळार हा शब्द कमी अशुद्ध आहे. तथापि कोणीही सुशिक्षित मनुष्य हल्लीं फळार असें म्हणावयाचा नाहीं. फळार हा शब्द अधिक शुद्ध आहे, तरी तो आपण ग्राम्य व हलकट समजतों. हल्लीं कुणबी व हलक्या जातीचे लोक मात्र फळार करतात व सुशिक्षित लोक फराळ करतात. त्याचप्रमाणें दुसरा एक शब्द आहे. वेदाच्या ऋचा रचणाऱ्या ऋषींचा आवडता शब्द जो गवेषण तो हल्लीं गवसणें व गावणें ह्या रूपानें आस्तित्वांत आहे. तोही शब्द आपण हलका समजतों, व त्याचा प्रचार आज हलक्या जातीमध्यें आहे. **विराकत** ( विरक्ति ), **सजणा** ( सज्जन ), **जरतारी** ( जरीच्या नक्षीचें ) इत्यादि शब्दांमध्यें अर्थाच्या संबंधानें किंवा नीतीच्या संबंधानें कांहीं हलकेपणा नसून, ते शब्द आपण सुशिक्षित म्हणविणारे लोक वापरीत नाहीं. अशा प्रकारची अवनति केवळ यदृच्छेवर अवलंबून असते. सुशिक्षित लोक "**गवसणें**" हा शब्द

सोडून देऊन "सांपडणें" ह्या शब्दाचा उपयोग करूं लागले, ह्यास कांहीं कारण नाहीं; हें शुद्ध यादृच्छिक होय. आम्ही ह्या नीतिगर्भ शब्दाच्या विवरणांत यदृच्छावनत शब्दांविषयीं कांहीं न लिहितां दुसऱ्या प्रकारच्याच म्हणजे अर्थावनत शब्दांविषयीं लिहिणार आहों.

शब्दांस ह्या दुसऱ्या प्रकारची म्हणजे अर्थाच्या संबंधाची अवनति प्राप्त होण्याचीं तीन कारणें आहेत. मनुष्याच्या मनाचे कांहीं निंद्य धर्म हें एक कारण, प्रापंचिक अवनति हें दुसरें कारण, व चिरपरिचय हें तिसरें कारण. आतां ह्या तीन कारणांचा क्रमानें विचार करूं.

मनुष्याच्या मनाची वाईटाकडे असलेली प्रवणता, म्हणजे प्रशंसार्ह वस्तूची प्रशंसा करण्यापेक्षां निंदार्ह वस्तूची निंदा करण्याकडे अधिक कल, पदार्थांच्या ठायीं असलेल्या सद्‌गुणापेक्षां दुर्गुणाकडे अधिक लक्ष, फार तर काय पण चांगल्या वस्तूची निंदा करणें, चांगल्या वस्तूचा उपहास करणें, चांगल्या वस्तूविषयीं लोकांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न होईल असें करणें, चांगल्या वस्तूकडे कुत्सित दृष्टीनें पाहणें, वगैरे जे मनुष्याच्या मनाचे धर्म आहेत, त्यांचेमुळें शब्दाच्या अर्थाची अवनति होते, आणि अर्थातच वर सांगितलेले निंद्य धर्म अवनत झालेल्या शब्दांत प्रतिबिंबित झालेले असतात. हे गर्हणीय धर्म भिन्न व्यक्तींचे ठायीं भिन्न प्रमाणानें असतातच. तरी कोणीही व्यक्ति ते धर्म आपल्याठायीं आहेत असें जनांत तर काय परंतु मनांत देखील कबूल करण्यास सहसा सिद्ध होणार नाहीं. तथापि मनुष्याच्या विचारांचें द्वार जी भाषा तिच्या ठायीं त्या धर्मांचें प्रतिबिंब उमटलेलें असतें. भाषेंतील शब्द त्याच्या मनाच्या व्यापारांचे व्यंजक असतात. आतां कोणी असा पूर्वपक्ष करतील कीं,

असल्या प्रकारच्या शब्दांपैकीं प्रत्येक शब्द प्रथम एकच मनुष्य प्रचारांत आणतो व त्यामुळें सर्व मनुष्यांच्या मनाची प्रवृत्ति वाईटाकडे आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. परंतु एकाद्या विशिष्ट व्यक्तीनें तो शब्द प्रथम प्रचारांत आणलेला असला तरी सर्व लोकांनीं त्याचा स्वीकार करणें, संभाषणांत त्याचा उपयोग करणें, त्याच्या उपयोगाविषयीं मनांत किंतु न बाळगणें, वगैरे गोष्टींवरून प्रत्येक व्यक्तीच्या मनाचा ठसा त्या शब्दांत उमटलेला असतो, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. असो; तर ह्या निंद्य स्वभावामुळें जे शब्द अवनत झालेले आहेत, ते शब्द पहिल्या वर्गांत येतात. दारू इत्यादि शब्द या प्रकारचे आहेत.

**१२. दारू.**–ह्या शब्दाचा अर्थविपर्यास मनांत आणला म्हणजे मनुष्याच्या मनाचा कल स्वतःचीं वाईट व्यसनें छपविण्याकडे व दुसऱ्याचीं प्रकाशांत ओढून आणण्याकडे किती जोराचा असतो, हें आपणांस समजेल. दारू हा फारसी शब्द असून त्याचा त्या भाषेंत औषध असा अर्थ आहे. मद्यप्राशन करणारे लोक आपलें व्यसन छपविण्यासाठीं मद्यावर औषधाचें पांघरूण घालतात. हल्लीं ज्याप्रमाणें मद्यपी लोक रस्तोरस्तीं दिसणाऱ्या दवाखान्यांपैकीं एकाद्या दवाखान्यांत सुळ्कदिनी शिरून मद्याचा 'डोस' झोंकून येतात, व कोणी त्यांस आंत शिरतांना व बाहेर येतांना पाहिलेंच आणि प्रश्न केलाच तर कांहीं 'मेडिसिन' घ्यावयास गेलों होतों, असें उत्तर ठोकून देतात, त्याप्रमाणें पूर्वी मुसलमानी राज्याचे वेळीं मद्यपी लोक हकिमाचे दुकानीं जाऊन मद्याचा घोट झोंकून येऊन मी दारू घ्यावयास गेलों होतों, असें उत्तर देत असत. परंतु मद्यपी लोकांची ही लबाडी लोकांस लवकरच कळून येऊन दारू

हा शब्द सहजच मद्य ह्या शब्दाशीं समानार्थक झाला. कांहीं वर्षांनीं मेडिसीन ह्या शब्दाची अशीच दुर्दशा होईल कीं काय अशी भीति वाटते. देवा, आमच्या लोकांची आब्रू राख, आणि मेडिसिन शब्दास मद्याशीं समानार्थक होऊं देऊं नको!

अवनत शब्दांचीं **भादरणें, भादरपट्टी,** वगैरे शब्द उत्तम उदाहरणें आहेत.

**१३. भादरणें.**–हा शब्द भद्राकरण ह्या संस्कृत शब्दापासून झालेला आहे. भद्र म्हणजे चांगलें किंवा मंगळ. भद्राकरण हा शब्द आपल्या धर्मग्रंथांत प्रतिष्ठित असा समजून वापरलेला आहे. चौलादिक मंगल संस्कार करण्याच्या पूर्वीं मुंडन करावें लागतें. त्या विधींतील एक भाग जो मुंडनविधि त्यासच प्राधान्य येऊन भद्राकरण ह्याचा अर्थ केश काढणें असा झाला. हल्लीं मुंडनाविषयीं सोपहास बोलावयाचें असतां त्या शब्दाचा उपयोग करतात. म्हशी वगैरेच्या अंगावरील केश काढणें ह्यासही आपण तोच शब्द लावतों. भादरणें हा शब्द प्रचारांत आल्यावर त्यापासून भादरपट्टी असा मुंडनक्रियेचाच वाचक पण अधिक ग्राम्य असा शब्द झाला. मुसलमानी राज्यांत व पुढें मराठेशाहींत, पेशवाईत वगैरे धिंड काढतांना अपराध्याच्या डोईचे केश, मिशा, भिंवया, पापण्या वगैरे काढून त्यास गाढवावर बसवून गांवभर हिंडविण्याची चाल होती. तीवरून सर्वांगावरील केश काढणें हें अप्रतिष्ठेचें लक्षण मानण्यांत येऊं लागलें, व भादरपट्टी हा सोपहास मुंडनाचा वाचक शब्द फजीती करणें, अप्रतिष्ठा करणें, रागें भरणें, खरड काढणें वगैरे गोष्टींचा वाचक झाला. ह्या अर्थानें आपण भादरपट्टी ह्या नामाचाच उपयोग करतों; भादरणें ह्या क्रियापदाचा कधीं करीत नाहीं.

माझ्याहातून एवढीशी कोठें चुकी झाली, तर त्यानें गय न करितां माझी सर्व लोकांसमक्ष भादरपट्टी काढली, असें आपण म्हणतों. त्यानें मला भादरलें, असें म्हणत नाहीं.

**१४. शिक्षा.**–ह्या गोड, रसाळ, मधुर व भाषेला भूषणावह अशा शब्दाचें तरी थोडें मातेरें झालें आहे काय? शिक्षा म्हणजे शिकविणें, बुद्धीचा विकास करणें, सन्मार्गाकडे प्रवृत्ति उत्पन्न करणें, असा पूर्वीचा अर्थ असून, हल्लीं शिक्षा करणें म्हणजे मारणें, पारिपत्य करणें असा अर्थ झाला आहे. शिक्षकांचा प्रयत्न स्पेन्सरनें उपदेशिलेल्या मार्गानें विद्यार्थ्याची बुद्धि बळकट करून, तिचें सामर्थ्य वाढवून, तिला स्वावलंबी करण्याकडे नसून, जुलमानें, धाकानें त्याच्या डोक्यांत ज्ञान ठांसून भरण्याकडे अधिक असल्याकारणानें शिक्षा करणें ह्याचा अर्थ पारिपत्य करणें असा झाला. परंतु दुःखांत सुख मानावयास हें आहे कीं, त्याच धातूपासून निघालेल्या शिक्षक ह्या शब्दाचा मूळचा चांगला अर्थ अद्याप आपण कायम राखला आहे.

**१५. शासन.**–शासन ह्याचाही मार्ग दाखविणें, उपदेश करणें असा संस्कृतांत अर्थ असून, मराठींत शासन करणें ह्याचा अर्थ बडविणें, पारिपत्य करणें असा झाला आहे. मार्ग दाखविण्याचे कामीं शरीरास वारंवार इजा दिली जाते (मग ती शास्त्याच्या मूर्खपणामुळें किंवा शिष्याच्या मूर्खपणामुळें दिली जावो) ह्यावरून शासन करणें म्हणजे पारिपत्य करणें असा अवनत अर्थ झाला.

**१६. नसीहत.**–(मराठींत नश्यत) हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ पढविणें, ताकीद देणें, असा आहे. परंतु ह्या कामांत मला नश्यत लागली, वगैरे सारख्या प्रयोगांमध्यें त्याचा अर्थ ठोकर बसणें असा होतो. हा अर्थ-

विपर्यास एका उत्कृष्ट इंग्रजी म्हणीची आठवण करून देतो. "He who will not be guided by the rudder must be guided by the rock," सुकाणुं आणि खडक ह्यांचा जो संबंध आहे तोच उपदेश आणि ठोकर ह्यांचा आहे. शहाण्या माणसानें केलेला उपदेश न जुमानला असतां ठोकर बसावयाचीच !

**१७. राष्टाण.**–हा शब्द रासस्थान ह्या संस्कृत शब्दापासून झाला आहे. रासनाहाणीं ज्या पुरुषानें पाहिलीं आहेत त्याला राष्टाण शब्दाच्या हल्लींच्या अर्थामध्यें कांहीं अतिशयोक्ति आहे असें वाटणार नाहीं. बायकांचें मानपानाकरितां चरफडणें, मुलांची धांदल, पोरींचा गोंधळ, चिलीपिलीचें ओरडणें आणि ओरडणें आणि खिदळणें, उखाण्याचा भडिमार, पाणक्यांचा खडखडाट, कासारांची बुलबुल, आणि मोलकरणींचा कुलकुलाट, वगैरे प्रकार ज्यानें आपल्या डोळ्यानें अवलोकिले आहेत, त्यास राष्टाण ह्याचा अर्थ गोंधळ, पसारा, असा होणें, हें अगदीं साहजिकच वाटेल.

**१८. अस्त्रायफट**.–अस्त्रायफट म्हणजे विधवा ! संध्येमध्यें अस्त्रायफट हें पद उच्चारून आपण टाळी वाजवितों, अस्त्रा ह्या शब्दाचें वस्त्रा ह्या शब्दाशीं सादृश्य, फट शब्दाचा उच्चार, त्याच्या बरोबर होणाऱ्या टाळीचा आवाज, हीं वस्त्रा व चामड्यावर चटक फटक असा त्याचा आवाज ह्यांचें स्मरण करून देतात. त्यावरून अस्त्रायफट हा शब्द अनेकविध साहचर्यानें क्षौरिकाच्या पुढें बसलेल्या विधवेचा वाचक झाला. हा शब्द मनुष्याचे, क्रौर्य, निर्लज्जपणा, आणि पाषाणहृदयता, ह्यांचें उत्कृष्ट निदर्शक आहे.

**१९. हेपलणें.**–हेपलणें हा शब्द अति ग्राम्य अर्थानें योजला

जातो. हा ग्राम्य अर्थ अलीकडच्या शंभर वर्षांतच त्या शब्दास जडला असावा. कारण हेबाळणें (हेपलणें शब्दाचें अधिक शुद्ध रूप) हा शब्द मोरोपंतानें एका गंभीर व हृदयद्रावक प्रसंगीं योजला आहे.

**दुःशासनासि म्हणती भीमादिक निज मनांत हेबाळ ।**
**इं सुप्त सर्पिणीतें मेली मानून ओढ हे बाळ ॥ १ ॥**

हेबाळ हा शब्द " अबल " ह्या शब्दापासून झाला आहे. ह्याचा अर्थ निःशक्त, व तो क्रियापदाप्रमाणें योजला असतां निःशक्त करणें, वाईट रीतीनें वागविणें, छळणें, हाल करणें, इत्यादि अर्थ दाखवितो. ह्याच अर्थानें मोरोपंतानें "हेबाळणें" हा शब्द वरील आर्येंत योजला आहे; परंतु हल्लीं हेपलणें हा शब्द सभ्य मंडळींत उच्चारण्याची कोणाची छाती होईल?

**२०. अवलाद.**–हा अरबी शब्द असून त्याचा अर्थ मुलगे असा आहे. त्याचें एकवचन वल्लद असें आहे. वल्लद म्हणजे मुलगा. "रामा वल्लद तुका" (रामा मुलगा तुक्याचा) अशा परिभाषेंत वल्लद ह्याचा अर्थ कांहीं वाईट नाहीं. परंतु अवलाद ह्याचा अर्थ अवनत झाला आहे. अवलाद हें अनेकवचनाचें रूप असून आपण तें एकवचनाचें समजतों, व मराठींत " अवलादी " असें त्याचें अनेकवचन करतों. " अवलाद " ह्या शब्दाचा अर्थ किती अवनत झाला आहे हें पुढील वाक्यांवरून कळून येईल. " गोंद्या म्हणजे ह्या गांवांतील एक अवलाद आहे. गांवांत कोणाचें घर फुटलें, एकादा खून झाला, एकाद्या घरास आग लागली, कीं त्यांत गोंद्याचें कांहीं अंग नाहीं, असें कधीं व्हावयाचें नाहीं. असा मिस्कीन आहे, कीं कांहीं बोलावयाची सोय नाहीं!" "अरे तो विठ्या असें काम करील ह्याचें तुला आश्चर्य तें काय

वाटतें? त्या सावळ्या दरोडेखोराचीच ती अवलाद!" अरबी भाषेमध्यें "अवलाद" ह्याचा अर्थ अवनत नाहीं हें सांगणें नकोच.

**२१. पांडित्य.**—पंडित हा शब्द आपण विद्वान् ह्या अर्थानें योजतों; परंतु पांडित्य हा शब्द आपण चारगटपणा, वाचाळपणा, किंवा निरर्थक भाषण, अशा निंदाव्यंजक अर्थानें योजतों. **वाक्पटु, वाक्पांडित्य** हेंही शब्द आपण निंदाव्यंजक अर्थानें योजतों. ह्या अवनतीचें कारण उघड आहे. जगामध्यें खऱ्या विद्वत्तेपेक्षां विद्वत्तेचा अभावच बहुधा आढळतो. आपण विद्वान् आहों अशी शेखी मिरविणारे लोक क्वचितच विद्वान् असतात. "न हि स्वर्णे ध्वनिस्तादृग्यादृक्कांस्ये प्रजायते" ह्या वचनाची प्रतीति आपणास नेहमीं येत असते.

**२२. अद्दल.**—अद्दल हा शब्द अरबी असून, त्याचा त्या भाषेंत इनसाफ, न्याय असा अर्थ आहे; परंतु जे कोणी आपला तंटा तोडून घेण्यासाठीं कोडतांत जातात, त्यांच्या इच्छेविरुद्ध (निदान त्यांपैकीं एकाच्या तरी इच्छेविरुद्ध) निकाल लागावयाचाच. त्यामुळें हा असंतुष्ट मनुष्य निकालास शिव्या देऊन म्हणतो, "मला मोठी अद्दल घडली." अशा रीतीनें अद्दल याचा अर्थ मराठींत ठोकर असा झाला.

आतां शब्दांच्या अवनतीचें जें दुसरें कारण, मनुष्याची प्रापंचिक अवनति, त्या कारणाचा आतां विस्तारें करून विचार करूं.

मनुष्याच्या प्रापंचिक अवनतीवरूनसुद्धां शब्दांस अवनति प्राप्त होते, आणि असें होणें हें अगदीं साहजिक आहे. शब्द जर वस्तूंचीं एक प्रकारचीं चित्रें आहेत असें आपण समजतों, तर त्या वस्तु आपल्या दृष्टीनें अवनत झाल्या असतां त्यांचीं चित्रेंही आपणास अवनत वाटणारच. रामचंद्र आपणास वंद्य

आहेत म्हणून त्यांच्या चित्रास नमस्कार करावा, असें आपणांस वाटणें साहजिकच आहे; परंतु जर आपल्या मनांत, किंवा विचारांत, किंवा समजुतींत बदल होऊन आपली जुन्या धर्मावरील श्रद्धा नाहींशी झाली, किंवा आपण अमूर्तिपूजक झालों, तर आपण त्याच चित्रास, ( ज्यास आपण पूर्वी पूज्य मानीत असूं त्यास ) नमस्कार करण्यास प्रवृत्त होणार नाहीं. आणि हीच गोष्ट वस्तूच्या उन्नतीवरून तद्वाचक शब्द उन्नत होणें किंवा वस्तूच्या अवनतीवरून तद्वाचक शब्द अवनत होणें ह्या व्यापारास लागू आहे.

**२३. उपाध्याय.**–उपाध्याय हा शब्द संस्कृतांत मोठ्या संमाननीय पदवीचा वाचक आहे; परंतु उपाध्यायाच्या ठायीं उत्तरोत्तर विद्येचा लोप होत गेल्याकारणानें व द्रव्याभावामुळें समाजांत त्याचें महत्त्व कमी झालें, व तो पूर्वीच्या मानास अपात्र झाला, तेणेंकरून "उपाध्या" हाच शब्द मराठींत "घंटा-बडव्या" ह्या अर्थानें योजला जाऊं लागला.

**२४. मिस्कीन.**–हा शब्द अरबी असून त्याचा त्या भाषेंत व फारशींत गरीब असा अर्थ आहे; परंतु जे गरीब असतात त्यांचा अनीतीकडे कल असण्याचीं श्रीमंतापेक्षां बलवत्तर कारणें असल्यामुळें मराठींत त्याचा अर्थ लुच्चा असा झाला.

**२५. बिलंद.**–बुलंद ह्या फारशी शब्दाचा "उंच" असा अर्थ असून मराठींत बिलंद ( किंवा बिलंदर ) ह्याचा अट्टल सोदा असा अर्थ झाला आहे.

**२६. शागीर्द.**–ह्या फारशी शब्दाचा मूळचा अर्थ विद्यार्थी असा असून मराठींत पाणक्या किंवा आचारी असा झाला आहे.

**२७. शिष्या.**–ह्याचा मूळचा अर्थ विद्यार्थी असा असून

मराठींत पाणक्या किंवा आचारी असा अर्थ होतो. शागीर्द आणि शिष्या ह्या दोन्ही शब्दांचें एकाच कारणानें मतेरें होऊन हल्लींचा अर्थही दोघांचा एकच आहे. त्याचप्रमाणें ब्राह्मण, आचारी, भट इत्यादिकांचेही अर्थ अवनत झालेले आहेत तें वाचकांच्या नजरेस येण्याजोगें आहे. शब्दांस अवनत करणारी प्रापंचिक अवनति ब्राह्मण, शिष्या, आचारी, भट वगैरे शब्दांत दृष्टीस पडते. ह्याच प्रकारचीं दुसरीं कांहीं उदाहरणें मागें आलीं आहेत तीं वाचकांस आठवतीलच.

चिरपरिचितत्वाच्या योगानें शब्दास अवनति प्राप्त होते असें आम्हीं मागें म्हटलें आहे, त्याचा आतां खुलासेवार विचार करतों.

बीभत्स व ओंगळ वस्तूविषयीं बोलण्याची मनुष्यास खंती असते, व ही खंती त्याला भूषणावहच होय. त्या वस्तूच्या विषयीं त्याला बोलावयाचा प्रसंग आलाच तर तो त्या वस्तूचा दुरूनच निर्देश करतो, त्या वस्तूचा तो प्रत्यक्ष उच्चार करीत नाहीं. स्त्रियांच्या प्राथमिक रजःस्रावासंबंधानें बोलावयाचें असतां "रजःस्राव" किंवा "ऋतुदर्शन" हे शब्द घातले असतां बीभत्स वस्तूचें स्पष्ट वर्णन केलें असें होतें; म्हणून तिला "नाहाणें" आलें म्हणजे ठराविक समयीं स्नान करण्याचे दिवस आले असा अप्रत्यक्ष रीतीनें विवक्षित वस्तूचा निर्देश करणारा "नहाण" हा शब्द प्रचारांत आला; परंतु पुढें ती बीभत्स वस्तु व तिचा वाचक "नहाण" हा शब्द ह्यांचें साततिक साहचर्य झाल्या कारणानें त्या बीभत्स वस्तूचा बीभत्सपणा "नहाण" ह्या शब्दास प्राप्त होऊन, तो शब्द आलिकडे प्रतिष्ठित संभाषणांत योजला जात नाहीं. त्याच्याबद्दल बायका "मुका मुलगा" व पुरुष "रजोदर्शन" असें म्हण-

तात. असो, सांगावयाचें म्हणून इतकेंच कीं, बीभत्स व ओंगळ वस्तूंचे वाचक शब्द साततिक साहचर्यामुळें कालांतरानें ग्राम्य ठरतात व मनुष्यांस प्रतिष्ठित संभाषणांत योजण्यास दुसरे कोणते तरी विप्रकृष्ट शब्द म्हणजे त्या वस्तूंचा दुरून दुरून निर्देश करणारे शब्द शोधावे लागतात; परंतु बीभत्स व अमंगळ वस्तूचा निर्देश करण्यासाठीं प्रथम कितीही विप्रकृष्ट म्हणजे दूरचा शब्द योजला तरी कालांतरानें असें होतें कीं, ती बीभत्स वस्तु व तिचा वाचक जो विप्रकृष्ट म्हणजे अर्थात प्रतिष्ठित शब्द ह्या दोघांचें साततिक साहचर्य झाल्यामुळें त्या वस्तूचा बीभत्सपणा क्रमानें त्या शब्दाचे ठायीं येतो. असें झालें म्हणजे, हा विप्रकृष्ट व प्रतिष्ठित शब्द संनिकृष्ट व ग्राम्य ठरतो, व त्या बीभत्स वस्तूचा प्रतिष्ठितपणें निर्देश करण्यासाठीं लोकांस आणखी एकादा शब्द हुडकावा लागतो. आश्चर्याची गोष्ट ही कीं, असा शब्द शोधण्यासाठीं त्यांना कांहीं प्रसंगीं तर लांब सुद्धां जावें लागत नाहीं. प्रथम प्रतिष्ठित म्हणून प्रचारांत आणलेला पण नंतर अप्रतिष्ठित ठरलेला शब्द प्रचारांत येण्याचे आधींचा जो अप्रातिष्ठित शब्द तोच बहुत काळपर्यंत कानावर न आल्याकारणानें त्याच्या ठायींचा बीभत्सपणा लोपलेला असतो व तोच आतां प्रतिष्ठा पावून प्रचारांत येतो. कुस्ती खेळतांना ज्याप्रमाणें एका मल्लास दुसरा मल्ल खालीं पाडतो, व आपण त्याच्यावर बसतो, इतक्यांत खालीं पडलेला मल्ल उठून आपल्या प्रतिपक्षास खालीं पाडून आपण त्याजवर बसतो, तो पुन्हा खालीं पडलेला पुन्हा उठून दुसऱ्यास पाडतो, त्याप्रमाणें शब्दांचें माहात्म्य व प्राबल्य वाढतें किंवा कमी होतें. एका शब्दानें दुसऱ्यास पदच्युत करावें, दुसऱ्यानें पहिल्यास, पुन्हा पहिल्यानें दुसऱ्यास, ह्या

प्रमाणें राहाटी चाललेली असते. ही राहाटी मनुष्याच्या अंगीं जो बीभत्स वस्तूचा प्रत्यक्ष रीतीनें उल्लेख न करतां दुरून दुरून उल्लेख करण्याचा कल असतो, त्याची मोठी प्रशंसार्ह रीतीनें साक्ष देते. ह्या राहाटीचें एक उत्कृष्ट उदाहरण आपणास "**शौच**" ह्या शब्दांत दृष्टीस पडतें. कोठा साफ करण्याच्या क्रियेस जो पूर्वीं शब्द होता तो लोकांस ग्राम्य वाटूं लागल्यावर त्याचे जागीं "स्वच्छ करणें" ह्या अर्थाचा साधा "शौच" हा शब्द प्रतिष्ठित संभाषणांत वापरण्यांत येऊं लागला. कालांतरानें पुढें त्या "शौच" शब्दाचें बीभत्स वस्तूशीं सदैव साहचर्य झाल्यामुळें तो अप्रतिष्ठित ठरला व त्याच्या जागीं त्याच्याही पेक्षां मोघम म्हणजे अर्थात् विप्रकृष्ट असा "परसाकडे जाणें" असा शब्द प्रतिष्ठित लोकांच्या उपयोगांत येऊं लागला. "परसाकडे" म्हणजे केवळ परसाच्या बाजूस जाणें हा सुरेख शब्द प्रचारांत आला; परंतु हल्लीं तो शब्द बीभत्स वस्तूच्या साहचर्यानें अप्रतिष्ठित ठरून आपण त्याच्या जागीं "शौच" हा मागें पडलेला शब्द अदबीच्या भाषणांत योजूं लागलों आहों.

**२८. भद्रलक्षणी, भद्रकपाळी.**–हे शब्द वाईट अर्थानें योजले जातात. त्यांचा वैयुत्पत्तिक अर्थ चांगला असून त्यांची वाईटाकडे लक्षणेनें योजना होऊं लागली. "आमचा बाब्या काय शहाणा आहे म्हणून सांगूं? आई देवाला गेली होती अशी संधि साधून त्यानें पेटीला किल्ली चालवून पैसे चोरून त्यांचे चुरमुरे आणून खाल्ले, इतका प्रतापी" ह्या वाक्यामध्यें "शहाणा" आणि "प्रतापी" हे शब्द लक्षणेनें योजलेले आहेत. असाच लाक्षणिक उपयोग भद्रलक्षणी व भद्रकपाळी ह्यांचा प्रथम होत असे; परंतु पुढें पुढें त्यांच्या

वैयुत्पत्तिक अर्थाचा लोकांस विसर पडून हल्लीं ते शब्द चांगल्या अर्थानें कधींच योजले जात नाहींत. जणों काय भद्रलक्षणी आणि भद्रकपाळी हे शब्द अभद्रलक्षणी आणि अभद्रकपाळी असेच आहेत.

२९. **शष्प.**—हा शब्द संस्कृतांत कोमल तृणाचा वाचक आहे; परंतु मराठींत त्याचा अर्थ कांहीं वेगळा आहे. मनुष्याच्या अंगावरील गुह्यस्थानचे केशांविषयीं अप्रत्यक्ष रीतीनें व प्रतिष्ठितपणानें बोलावयाचें असतां, केवळ साम्याच्या निर्देशावरून वक्तव्य वस्तूचा बोध करण्यासाठीं शष्प ह्या शब्दाचा उपयोग करण्याचा प्रचार पडला. शष्प ह्या गोड शब्दाचा प्राथमिक उपयोग गुह्यस्थ केशांच्या संबंधानें जो होऊं लागला तो मनुष्याच्या मनाच्या बीभत्स शब्द उच्चारण्याच्या खंतीवरून होऊं लागला. ही खंती अर्थात भूषणावहच होय; परंतु कालांतरानें चिरपरिचयाचा परिणाम त्यावर घडून तो बीभत्स ठरला. अशा प्रकारचीं दुसरीं पुष्कळ उदाहरणें देतां येतील; परंतु ग्राम्यपणाचा आरोप आमच्यावर येऊं नये, म्हणून तीं उदाहरणें आम्ही देत नाहीं.

वर आम्हीं अवनत शब्दांचीं उदाहरणें दिलीं आहेत; परंतु त्यांवरून वाचकांनीं असें समजतां कामा नये कीं, भाषेंतील शब्दांमध्यें अवनत होण्याचाच केवळ कल असतो; उन्नत झालेल्या शब्दांचींही उदाहरणें मराठींत पुष्कळ आहेत. मनुष्यप्राणी हा ज्या अर्थी सत् आणि असत् ह्यांचें मिश्रण आहे, त्याची सत् जें आहे त्याचेकडे प्रवृत्ति असते तशीच असत् जें आहे त्याचेकडेही प्रवृत्ति असते, त्या अर्थी भाषेमध्यें सुद्धां सत् आणि असत् ह्यांचे वाचक शब्द असावयाचे व उन्नत आणि अवनत असे दोन्ही प्रकारचे शब्द असावयाचेच.

३०. **धीट.**—संस्कृतांत धृष्ट शब्द नेहमीं वाईट अर्थानें योजला जातो. वडिलांचा मान न ठेवणारा, आपली योग्यता आहे त्यापेक्षां अधिक समजणारा असा निंदाव्यंजक अर्थ धृष्ट ह्या शब्दाचा आहे; परंतु मराठींत धीट हा त्याच्याच पासून उत्पन्न झालेला शब्द चांगल्या अर्थानें योजला जातो. अंगीं धीटपणा असणें हें आपण चांगलें समजतों.

३१. **धारिष्ट.**—धारिष्ट हा शब्द संस्कृत धार्ष्ट्य यापासून झालेला असून, तो धीट शब्दापेक्षां अधिक चांगल्या अर्थाचा आहे; कारण ह्या शब्दामध्यें धीटपणाचा अर्थ असून शिवाय प्राप्तसाहिष्णुता ह्या उत्तम गुणाचाही समावेश होतो.

३२. **मर्द.**—मर्द हा शब्द आपण फारशींतून घेतलेला आहे. त्या भाषेमध्यें त्याचा अर्थ सामान्येंकरून पुरूष असा असून, पुरुष ह्या नांवास योग्य असा पुरूष हाही त्याचा अर्थ आहे; परंतु आपण मराठींत पहिला सामान्य अर्थ न घेतां दुसरा जोरदार अर्थ घेतला आहे. उ० "अरे तूं असा मर्दासारखा मर्द असून, तुला दुसऱ्यावर अवलंबून राहण्याचें काय कारण आहे?"

३३. **हिय्या.**—भित्र्या मनुष्यास हृदय असतें तसें धीट मनुष्यासही हृदय असतें; परंतु धीट मनुष्याचेंच हृदय **हिय्या** शब्दामध्यें द्योतित केलेलें आहे. प्राकृतांत हृदय ह्याचें रूप "हिअअ" असें असून त्यापासून मराठी "हिय्या" हा शब्द आलेला आहे.

३४. **बालबोध.**—बालबोध ह्याचा अर्थ आंत एक व बाहेर एक असें न करणारा, आपलें खरें स्वरूप नैतिक धैर्यानें दाखविणारा आणि म्हणून लहान मुलांस सुद्धां तो कोणत्या प्रकारचा मनुष्य आहे हें ओळखतां येण्याजोगा असा आहे; परंतु आपण बालबोध हा शब्द नेहमीं चांगल्या अर्थानें

योजतों. वाईट मनुष्याच्या अंगीं नैतिक धैर्य असल्यास तोही आपलें खरें स्वरूप जगास दाखविण्यास अनमान न करणारा असा असेल; परंतु तसा अर्थ बालबोध ह्या शब्दाचा न करतां आपण चांगल्या मनुष्याच्या संबंधानेंच तो योजतों. चांगल्या चालीचा, साधा, छक्केपंजे न करणारा जो मनुष्य त्यासच आपण बालबोध म्हणतों. ह्या अर्थानें बालबोध हा शब्द आपण बालबोध लिपी व मोडी लिपी ह्यांच्यांतील भेद मनांत आणून प्रथम योजूं लागलों हें सांगणें नकोच.

३८. **त्वंपुरा**.–त्वंपुरा हा शब्द निंदाव्यंजक शब्द उच्चारण्याविषयींची आपल्या मनाची खंती दाखवितो. त्वंपुरा ह्याचा अर्थ "बोंब, शंख अथवा फजीती" असा आपण करतों. ह्याचा उपयोग पुढील सारख्या प्रसंगीं होतो. "मी तुला सांगत नव्हतों कीं तुझी परीक्षा जवळ आली आहे; पत्ते खेळण्यांत, चकाट्या पिटण्यांत आपला वेळ गमावूं नको म्हणून? पण माझें ऐकतो कोण? तुझा आपला क्रम चालला होताच. आतां परीक्षेंत तुझा त्वंपुरा वाजला! वाजायचाच!" त्वंपुरा ह्या मराठी शब्दाच्या पोटांत दोन संस्कृत शब्द आहेत. ते "त्वं" आणि "पुरा" हे होत. ह्यांचा अर्थ अनुक्रमें तूं आणि पूर्वी असा आहे व त्यांपासून "शंख" असा अर्थ कसा व्हावा? आपल्या पूजेमध्यें शंखाचें वर्णन आहे तें असें:—

**त्वं पुरा सागरोत्पन्नो विष्णुना विधृतः स्वयं ॥**
**नमितः सर्वदेवानां पांचजन्य! नमोऽस्तु ते ॥ १ ॥**

"तूं पूर्वी सागरापासून उत्पन्न झालास; विष्णूनें स्वतः तुला स्वीकारलें; सर्व देव तुला नमितात; हे शंखा, तुला नमन असो." असा ह्या श्लोकाचा अर्थ असून, शंख शब्द न उच्चारतां त्याच्या वर्णनांतील पहिले दोन

शब्द उच्चारून आपण त्याचा निर्देश करतों; परंतु अलीकडे तो शब्द ग्राम्य ठरत चालला आहे.

**३६. ग्वाही.**–ग्वाही हा फारशी शब्द गवाह शब्दापासून झाला आहे. गवाह म्हणजे पुरावा किंवा साक्षी व गवाही म्हणजे साक्षीदार किंवा पुरावा. आपण त्याचा अर्थ पुरावा असा न करतां चांगलेपणाचा पुरावा, योग्यत्वाची खात्री करून देणारें प्रमाण असा उन्नत अर्थ करतों. "आपलें मन ज्याविषयीं आपणास ग्वाही देईल तेंच करावें" अशा सारख्या प्रयोगांत आपण ग्वाही हा शब्द योजतों.

**३७. घरांत आलेली.**–मनुष्याच्या मनाचा कल प्रशंसेपेक्षां निंदेकडे अधिक आहे, किंवा वस्तूकडे कुत्सित नजरेनें पाहणें जरी त्याला आवडतें तरी विनाकारण किंवा भलत्याच प्रसंगीं तो निंदा करीत नाहीं व कुत्सित नजरेनें वस्तूंकडे पाहत नाहीं. ज्या वस्तूंविषयीं तो प्रसंगविशेषीं तिरस्काराचे उद्गार काढील, ज्या वस्तूंची तो प्रसंगविशेषीं निंदा करील, किंवा ज्या वस्तूकडे तो प्रसंगविशेषीं कुत्सित नजरेनें पाहील त्या वस्तूविषयीं सामान्य प्रसंगीं तो सौम्यच शब्दानें बोलतो. त्यामुळें आपल्या भाषेमध्यें शेंकडों वस्तूंस दोन दोन नांवें आहेत. तीं अगदीं समानार्थक असून एक नांव प्रतिष्ठित समाजांत योजलें जातें. एका एका वस्तूस दोन दोन नांवें असणें ह्यावरून मनुष्यप्राणी अत्यंत शुचिर्भूत आहे असें जरी सिद्ध करितां आलें नाहीं, तरी निदान अगदींच पतित, अगदींच नीच, अगदींच निर्लज्य नाहीं, असें सिद्ध होतें. चांडाळचौकडींत विधवेचा निर्देश जरी अस्त्रायफट किंवा बोडकी ह्या नांवांनीं केला गेला तरी प्रतिष्ठित समाजांत तिला **"घरांत आलेली"** असें म्हणतात.

**३८. जंत**:–त्याच प्रमाणें दुसरी एक गोष्ट विचार करण्याजोगी आहे. ज्या वस्तु जात्या अमंगळ किंवा बीभत्स किंवा हिडिस्स त्या वस्तूंचा सामान्य शब्दांनीं, किंवा विप्रकृष्ट शब्दांनीं निर्देश करणें हेंही मानवी स्वभावास भूषणावहच होय. फार गोड खाल्ल्यापासून कोठ्यामध्यें एक हिडिस्स लांब प्राणी उत्पन्न होत असतो, त्याला प्राणी ह्या अर्थाचा सामान्य शब्द जंतु हा लावतात. जंतु ह्याचा अपभ्रंश "**जंत**."

**३९. जीव, जिवाणु**.–सापाला सुद्धां तसाच एक सामान्य शब्द जीव किंवा जिवाणु हा लावतात. सापाला किंवा नागाला आपण **लांब जनावर** असेंही म्हणतों. ह्यांतील तरी बीज हेंच आहे. लांब जनावर हा विप्रकृष्ट शब्द होय. त्या प्राण्याचें प्रत्यक्ष नांव न घेतां त्याच्या लांबपणावरून "लांब जनावर" असें वर्णनात्मक नांव आपण त्यास दिलेलें आहे. त्याचप्रमाणें रक्तपितीच्या हिडिस्स दुखण्यास **महारोग** किंवा **थोरला रोग** हें नांव दिलेलें आहे. दारिद्र्याबद्दल आपण **आकाबाई** म्हणतों. विधवेच्या प्राथमिक क्षौरास **सोंवळी करणें** म्हणतात. विधवेस **सोंवळी** म्हणतात. गतभर्तृकेस **घरांत आलेली** म्हणतात. हे सर्व प्रकार दुःखकारक वस्तूंचा सौम्य शब्दांनीं निर्देश करण्याची जी मनाची प्रवणता तिची साक्ष देतात.

अमंगळ, किंवा हिडिस्स वस्तूचा निर्देश करावयाचा तो सौम्य शब्दांनीं करण्याकडे आपली प्रवृत्ति असते. तसेंच मंगल व प्रियकर वस्तूच्या नाशाविषयीं बोलावयाचें असतां, किंवा त्या वस्तूच्या संबंधानें निरुपायास्तव कांहीं अप्रिय भाषण करावयाचें असतां सुद्धां विप्रकृष्ट किंवा सौम्य किंवा मंगलात्मक शब्दच आपण घालतों. आपल्या बायकांस कुंकवाइतकी प्रिय वस्तु कोणतीच नाहीं. कुंकूं हा शब्द त्यांच्या दृष्टीनें पति ह्या

शब्दाशीं समानार्थकच आहे. देव करो आणि कपाळचें कुंकूं अखंड राहो, अशी इच्छा बायका रात्रंदिवस करीत असतात. इतकी जर कुंकवाची योग्यता आहे, तर तें संपलें हें म्हणणें बायकांस अर्थात अप्रिय व कठोर वाटणार. यासाठीं झिंगाबाईचे कुंकवाचा साठा संपला म्हणजे ती एक मंगळ शब्द योजून आपला अर्थ दाखविते. "माझें कुंकूं परवां वाढलें, म्हणून किनई, मी पिंगाबाईचें कुंकूं दोन नखें मागून आणलें." अशा रीतीनें "कुंकूं संपलें" असें न म्हणतां **"कुंकूं वाढलें"** असें म्हणतात. कुंकवाची जी गोष्ट तीच बांगड्यांची गोष्ट. बांगड्या फुटल्या, किंवा पिचल्या असें न म्हणतां **वाढल्या** असें म्हणतात. तुळस आपण पूज्य मानतों म्हणून ती मेली असतां तुळस मेली असें न म्हणतां **"तुळस द्वारकेस गेली"** असें म्हणतों. रामचंद्र, धर्मराज इत्यादि पुराणप्रसिद्ध पुरुषांच्या मरणाविषयीं बोलावयाचें असतां ते मेले असें न म्हणतां **"निजधामास गेले"** असें म्हणतों. निजधाम म्हणजे स्वतःचें वसतिस्थान. ते पुराणप्रसिद्ध पुरूष देवांचेच अंश होत, असें आपण समजतों तेव्हां त्यांचें स्वतांच्या वसतिस्थानास जाणें म्हणजे स्वर्गलोकीं परत जाणें असा अर्थ होतो. तसेंच मनुष्याच्या मरणाविषयीं सौम्य शब्दांनीं किंवा प्रतिष्ठितपणानें बोलावयाचें असतां "तुकाराम मेला" असें न म्हणतां "तो **वारला**" असें म्हणतात. "वारला" म्हणजे "दृष्टीआड झाला" किंवा "पलीकडे गेला" आणि अशा रीतीनें वारला, ह्या विप्रकृष्ट शब्दानें "मेला" ह्या अर्थाचा निर्देश केला जातो. **थकला, आटोपला** इत्यादि शब्द ह्याच प्रकारचे होत. लुगडें जळलें असें न म्हणतां लुगडें **गौरवलें** असें म्हणतात.

मनुष्याचा द्वाडपणा व खोडसाळपणा हा **काफर** व **फिरंगी कावा** ह्या शब्दांत दृष्टीस पडतो. अविंध लोक आपणा हिंदूंस काफर असें म्हणतात. हा शब्द अरबी असून जे महमदी धर्माचे अनुयायी नव्हत त्यांच्या निर्भत्सनार्थ तो योजला जातो. महंमदी धर्माच्या अनुयायांनीं निर्भत्सनार्थ योजलेला शब्द आपण स्वीकारला; परंतु तो स्वतास लावून घेण्याकरितां नव्हे तर उलट त्यांसच लावण्याकरितां! शत्रूनें आपणांस दिलेलीं तिरस्कारव्यंजक नांवें होतां होईल तितकें करून रूढ होऊं न देण्याकडे सर्वांचा प्रयत्न असतो; परंतु आपणा हिंदूंस आपलाच धर्म अधिक वंद्य वाटत असल्यावरून अविंधांचा तिरस्कार मनांत न आणतां मोठ्या प्रेमळ बुद्धीनें आपण काफर हा शब्द त्यांसच लावून त्यांच्या ऋणांतून उतराई झालों!!! दुसरें हेंही लक्षांत बाळगण्याजोगें आहे कीं, काफर ह्या शब्दाचा आपण लुच्चा, क्रूर असाही अर्थ करतों. ज्याला आपण भेटावयास गेलों आहों त्याची परवानगी न घेतां परत येणें हें असभ्यपणाचें आहे. अशा परत येण्यास फ्रेंच लोक English leave म्हणतात व इंग्रज लोक French leave म्हणतात. तिरस्काराची फेड करण्यास मनुष्य किती उत्सुक असतो हें ह्यावरून उघड होतें. यूरोपी लोक आपणां हिंदूंचा वाजवीपेक्षां अधिक नम्रपणा, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या अन्यायावर आणि जुलमावर दाद मागण्याची भीति, कोणी विनाकारण जरी दटावलें तरी चळचळां कांपणें, इत्यादि गर्हणीय गुण पाहून **हिंदू** हा शब्द तिरस्कारानें भित्र्या माणसाबद्दल योजतात. आपण तरी त्याचें उट्टें काढावयास कांहीं कमी केलें नाहीं. **फिरंगी कावा** हा शब्द "Machiavellian Policy" अर्थानें आपण योजतो.

**प्रारब्धः**—प्रपंचामध्यें घडणाऱ्या नानाविध चांगल्या वाईट

गोष्टींचा कार्यकारणसंबंध स्पष्ट दाखवून मनुष्यास चांगल्या गोष्टीकडे प्रवर्तविण्याचा प्रयत्न हा "**प्रारब्ध**" शब्दांत आढळून येतो. प्रारब्ध म्हणजे प्रारंभिलेलें. आपणास जीं सुखें किंवा दुःखें प्राप्त होतात, तीं कांहीं अगम्य शक्तीवर अवलंबून नसतात; उलटपक्षीं तीं आपणांवरच अवलंबून असतात, म्हणजे आपल्या स्वतांच्याच चांगल्या किंवा वाईट कृत्यांचीं तीं फळें असतात हें मत लोकांच्या मनांत ठसल्यानें सहजच ते चांगल्याकडे संमुख व वाईटापासून पराङ्मुख होतात. आपणांस जें सुख प्राप्त होतें तें यदृच्छेनें प्राप्त न होतां आपणच पूर्वी केलेल्या पुण्यकर्माचें फळ असतें, असा लोकांचा विश्वास बसला, म्हणजे ते स्वावलंबी होऊन चांगलें करण्याकडे प्रवृत्त होतात. तसेंच जें दुःख आपल्या भोगास येतें, तेंही यादृच्छिक नसून आपल्याच वाईट कृत्यांचें फळ असें लोकांच्या मनांत ठसलें म्हणजे ते वाइटापासून सहजच पराङ्मुख होतात. शरीरास जे नानाविध व्याधि भोगावे लागतात तेही यादृच्छिक नसून आपल्या वाईट कृत्यांचें फळ असें लोकांच्या मनांत ठसलें म्हणजे वाईटापासून ते सहजच पराङ्मुख होतात. शरीरास जे नानाविध व्याधि भोगावे लागतात ते आपल्याच गैर वर्तनामुळें किंवा दुष्ट अन्नादिकांचे सेवनापासून उत्पन्न होतात. तसेंच भगवद्गीतेंत.

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ।**

या श्लोकांत वर्णिलेल्या पद्धतीस अनुसरून ज्याचा आयुष्यक्रम आहे, तो निरोगी शरीर व प्रफुल्लित मन ह्यांच्या योगानें सदा सुखी असतो. शरीराची सरोगता किंवा निरोगता, सुखावस्था किंवा दुःखावस्था, ह्यांचा नियमितपणा किंवा अनियमितपणा ह्यांच्याशीं निकट संबंध जेव्हांच्या तेव्हांच प्रत्ययास येतो, तेणें-

करून नियमितपणाकडे मनुष्याची प्रवृत्ति होते; परंतु संसारांत प्राप्त होणाऱ्या सुखदुःखांचा संबंध पूर्वीच्या काळीं केलेल्या सत् किंवा असत् कृत्यांवर अवलंबून असतो हें इतकें स्पष्टपणें लोकांस दिसत नाहीं. तथापि सुखदुःखें हीं पूर्वीच्या आपल्या कृत्यांवर अवलंबून असतात,हें तत्व लोकांच्या मनांत पूर्णपणें बिंबून गेलें असलें तर परिणाम चांगला होणार नाहीं काय? सुखाचें समयीं उच्छृंखल न होतां मनाची शांत वृत्ति सदैव कायम राखण्यास पूर्वी आरंभिलेल्याचा हा परिणाम आहे, असें जर मनुष्याच्या मनानें घेतलें तर तें किती इष्ट आहे बरें? त्याच्या चित्ताची समतोलता प्रारब्धाच्या तत्त्वानें किती सुंदर रीतीनें राहील बरें? पूर्वी आरंभिलेलें कृत्यच फळास येतें हें तत्व लोकांच्या मनांत बिंबून गेल्याची व हें तत्त्व नेहमी लोकांच्या डोळ्यांपुढें उभें असण्याच्या इष्टतेची "प्रारब्ध" हा शब्द साक्ष देतो; परंतु कालावधीनें "प्रारब्ध" ह्या शब्दाचा मूळचा अर्थ नष्ट होऊन दैव, नशीब ह्या शब्दांशीं तो समानार्थक झाला. त्या शब्दाच्या योगानें जें तत्त्व मतांत ठसणें इष्ट होतें, तें ठसेनासें झालें. मनुष्यास एकापेक्षां अधिक जन्म प्राप्त होतात ह्या सिद्धान्तापासून "प्रारब्ध" शब्दाची उत्पत्ति आहे हें सांगणें नकोच.

**प्राक्तन, भवितव्यता**:—वर प्रारब्ध शब्दाचें जें उद्घाटन केलें तेंच प्राक्तन व भवितव्यता ह्याही शब्दांस लागू आहे. प्राक्तन शब्दाचा अर्थ "पूर्वीचा" असा आहे. "भवितव्यता" ह्याचाही अर्थ "मागील कृत्यापासून जें निश्चयानें घडून यावयाचें तें" असा आहे.

नीतिगर्भ शब्दांचें विवरण याच्याहीपेक्षां अधिक विस्तारें-करून करण्यास जागा आहे हें विद्वान् वाचकांच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे. आम्हीं ह्या विषयांत फार खोल गेलों नाहीं याचें कारण असें कीं, आमचा हा साकल्येंकरून

शब्दांचें उद्घाटन करण्याचा प्रयत्न नाहीं. भाषाशास्त्राच्या ज्या शाखेकडे अद्याप आपल्या लोकांचें मुळींच लक्ष गेलेलें नाहीं तिकडे तें जाणें किती आवश्यक व इष्ट आहे व किती लाभप्रद असून मनोरंजक आहे हें दाखविण्याचा आमचा मुख्यत्वेंकरून प्रयत्न आहे. भाषेच्या शब्दांचें परीक्षण केल्या-पासून नानाविध माहिती कशी मिळण्याजोगी आहे हें कांहीं उदाहरणांनीं वाचकांच्या प्रतीतीस आणून दिलें म्हणजे आमचा इष्ट हेतु सिद्धीस गेला असें आम्हीं समजतों.

ह्या भागांत शब्दांचें जें उद्घाटन केलें आहे, त्यावरून भाषेंतील शब्दांचे ठायीं नीतीचें किंवा अनीतीचें बीज आढळतें असें वाचकांस आढळून येईल. शब्द हे जगांतील सुखदुःखाच्या व मनुष्यांच्या चांगल्या किंवा वाईट मनोविकारांच्या प्रतिमाच होत. जगाची स्थिति व मनाची स्थिति ह्या तोलण्याचा तराजू म्हणजे भाषेंतील शब्द. शब्दांच्या परीक्षणापासून एकाद्या देशाची नैतिकदृष्ट्या स्थिति कशी आहे, हें आपणास ठोकळ मानानें ठरवितां येतें व कधीं कधीं तर इतर साधनांवरून मिळणाऱ्या माहितीपेक्षां शब्दाच्या अभ्यासापासूनच अधिक सूक्ष्म माहिती मिळते.



# प्रकरण तिसरें.

## वृत्तगर्भ शब्द.

मागच्या दोन प्रकरणांत आम्हीं कवित्वगर्भ व नीतिगर्भ शब्दांविषयीं ऊहापोह करून शब्दांचे ठायीं कवित्व म्हणजे चारुतामूलक कल्पना व लोकांची उच्चावचास्थिति हीं कशीं प्रतिबिंबित झालेलीं असतात याची परिस्फुटता केली. आतां ह्या प्रकरणांत वृत्तगर्भ शब्दांविषयीं ऊहापोह करावयाचें आम्हीं योजलें आहे. म्हणजे आम्हीं शब्दांच्या परीक्षणापासून गत गोष्टींचें ज्ञान कसें प्राप्त होतें, हें दाखविणार आहों. वृत्ताची व्याप्ति कवित्व व उच्चावचभाव ह्यांचेपेक्षां अधिक आहे व ती अधिक आहे हें पुढील विवरणावरून स्पष्ट होईलच. आतां ह्या प्रकरणांत कोणचा विषय येईल, हें अधिक खुलासा करून सांगणें इष्ट आहे व तशींच पुढील विषयांची सदरें आम्हीं कशीं पाडणार आहों याचेंही थोडक्यांत दिग्दर्शन करणें आवश्यक आहे; कारण तसें केलें असतां आमच्या वाचकांस ह्या भागांतील विषयाचें सुलभ रीतीनें ग्रहण करतां येईल.

वृत्त म्हणजे गतगोष्टी किंवा गतगोष्टींचें ज्ञान. वृत्त शब्दामध्यें आम्हीं ज्या वस्तूंचा अंतर्भाव करतों, त्या ह्याः—प्राचीन काळचा व अर्वाचीन काळचा इतिहास, नानाविध स्थळांची माहिती, आपल्या चालीरीति, आपले आचारविचार, आपलीं मानलेलीं कर्तव्यें, आपल्या देशासंबंधीं इतर प्रकारची माहिती, इत्यादि. ही वृत्त शब्दाची व्याप्ति मोठी आहे, असें वाचकांस तेव्हांच कळून येईल. ह्या प्रकरणांत प्रथम आम्हीं आर्य लोकांचें मध्य एशियांतून भरतखंडाप्रत आगमन, आपणा भारतीय

लोकांचा युरोपी लोकांशीं जातिसंबंध व भाषासंबंध इत्यादिकांविषयीं शब्दांच्या परीक्षणापासून माहिती आपणास कशी मिळते हें दाखवूं; ( २ ) नंतर मुसलमानांचा व आपला संबंध कोणच्या प्रकारचा होता, हें शब्दपरीक्षणापासून कसें व्यक्त होतें हें दाखवूं; ( ३ ) नंतर आपले जुने आचार कसे होते व हल्लीं त्यांत कांहीं फेरफार झाला आहे किंवा नाहीं हें सांगूं; ( ४ ) नंतर आपल्या देशाची हवा, पाणी हीं शब्दांत कशीं प्रतिबिंबित झालीं आहेत हें दाखवूं; ( ५ ) नंतर वृत्तगर्भ शब्दांचीं कांहीं संकीर्ण उदाहरणें देऊं; ( ६ ) मग आपल्या असत्य कल्पना शब्दांवरून कशा व्यक्त होतात हें दाखवून असत्याचे पायावर अस्तित्वांत आलेल्या शब्दांस भाषेंतून हाकलून लावावें किंवा कसें ह्या आगंतुक प्रश्नासंबंधानें आमचें मत काय आहे हें सांगूं; आणि सरतेशेवटीं समग्र विषयाचा उपसंहार करूं. आम्हीं ज्या क्रमानें वृत्तगर्भ शब्दांचें उद्घाटन करणार त्याचें हें दिग्दर्शन झालें. आतां पहिल्या सदराकडे वळतों.

अर्वाचीन हिंदू व अर्वाचीन यूरोपी लोक हे प्राचीन काळीं एकाच ठिकाणीं राहत असत व एकच भाषा बोलत असत; त्यांच्या मूलस्थानीं जनविस्तार झाल्यामुळें, किंवा आपसांत तंटे झाल्यामुळें, किंवा अधिक सुपीक प्रदेशांत वास्तव्य करावें असें त्यांच्या मनांत आल्यामुळें ते आपलें मूलस्थान सोडून दूरदूरच्या देशांत राहावयास जाऊं लागले. त्या लोकांच्या मुख्य दोन शाखा होऊन एक आग्नेयीकडे गेली व एक वायव्येकडे निघाली. ज्या शाखेनें आग्नेयीकडे प्रयाण केलें, ती शाखा अफगाणिस्तानांत व पंजाबांत कांहीं काळ राहिली. परंतु मागून येणाऱ्या त्याच लोकांच्या आणखी आणखी टोळ्यांचा पाठीवर दाब पडल्यामुळें त्यांस तेथून आणखी

पूर्वेकडे जाणें भाग पडलें. कांहीं लोक तेथेंच आपलें वास्तव्य कायमचें करून राहिले व कांहीं पूर्वेकडे म्हणजे हिंदुस्तानांत येऊं लागले. अशा रीतीनें पूर्व दिशेकडे प्रयाण करतां करतां ते लोक थेट गंगा व ब्रह्मपुत्रा ह्या नद्यांच्या मुखांपर्यंत जाऊन ठेपले व अशा रीतीनें सिंधु नदापासून तों तहत ब्रह्मपुत्रा नदापर्यंतचा सर्व प्रदेश त्यांनीं व्यापून टाकला. वाटेंत त्यांना जे मूळचे रहिवासी भेटले त्यांनीं अडथळा केल्यास त्यांचा पराभव करून त्यांस डोंगरांत व रानांत, दऱ्यांत व खोऱ्यांत हांकून लावलें, व अडथळा न केल्यास त्यांना आपल्या समाजांत अंतर्भूत करून घेऊन त्यांनीं कालावधीनें सर्व प्रदेश आपलासा करून टाकला. त्यांचें वास्तव्य ह्या प्रदेशानें नियंत्रित असें एक हजार वर्षेंपर्यंत होतें. पुढें कांहीं साहसी व महत्वाकांक्षी लोकांच्या झुंडीच्या झुंडी विंध्यपर्वताचे दक्षिणेस येऊन दक्षिणेमध्यें कायमचें वास्तव्य करून राहिल्या; परंतु विंध्यपर्वताच्या उत्तरेस त्यांनीं ज्याप्रमाणें मूळच्या रहिवाशांचा बहुतेक उच्छेद करून टाकला किंवा आपल्या समाजांत त्यांस अंतर्भूत करून घेतलें किंवा हलक्या व रानटी स्थितींत राहावयास लावलें, त्याप्रमाणें त्यांस विंध्यपर्वताच्या दक्षिणेस करतां आलें नाहीं. मूळच्या रहिवाशांचीं जीं मोठमोठीं राज्यें होतीं तीं ह्या लोकांच्या बळापुढें टिकाव धरण्याइतकीं समर्थ असल्यामुळें म्हणा, किंवा कालगतीनें ह्या आर्य लोकांचा प्राथमिक कस व कुवत नष्ट झाल्यामुळें म्हणा, किंवा त्यांच्या प्रकृति सौम्य झाल्यामुळें म्हणा, किंवा दाक्षिणात्यांच्या आरंभशूरत्वाचा प्रवाद रूढ करण्याकरितां म्हणा, हीं मूळच्या रहिवाशांचीं राज्यें व त्यांचें समाज व त्यांच्या भाषा ह्यांचा त्यांचे हातून उच्छेद झाला नाहीं. हीं पूर्वीप्रमाणेंच कायम राहिलीं. म्हणजे जुन्या लोकांचे समाज

व राज्यें व भाषा हीं आणि नव्या लोकांचे समाज व राज्यें व भाषा हीं शेजारीं शेजारीं नांदत राहिलीं. एतद्देशीय जुने लोक अद्यापीही दक्षिणेंत आहेत; त्यांचे समाज आहेत, त्यांचीं राज्यें आहेत व त्यांच्या भाषाही जागत्या असून अभियुक्त आहेत.

हिंदुस्तान देशांत येऊन वास्तव्य करून राहणाऱ्या लोकांचा वर जो इतिहास दिला आहे तो याच शतकांत ठरविला गेला आहे व हा इतिहास ठरविण्यास साधनीभूत होण्याचें श्रेय सर्वथैव शब्दांवर आहे. ह्या प्राचीन इतिहासाचें निरूपण करणारे ग्रंथ आपणाजवळ नाहींत. हा इतिहास केवळ शब्दांच्या अभ्यासावरून निश्चित झाला आहे व त्याचा निश्चितपणा ग्रंथांच्या आधारावरून अप्रत्यक्ष रीतीनें समर्थित करतां येतो. शब्दांच्या अभ्यासावरून हा इतिहास जो आपणांस मिळाला आहे तो फार महत्वाचा आहे; चार हजार वर्षांपूर्वी घडलेला वृत्तांत आज आपणांस जाणण्याची दुसरीं कांहींएक साधनें विद्यमान नाहींत, तथापि केवळ शब्दांच्या अभ्यासापासून तो वृत्तांत जणूं काय आपण प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिल्याप्रमाणें आपणांस दिसत आहे! आतां शब्दांच्या अभ्यासापासून हा वरील वृत्तांत कसा समजतो हें आपण पाहूं; परंतु आधीं आम्हीं हें सांगितलें पाहिजे कीं, प्रस्तुत विषयाचें निरूपण हें आमच्या मुख्य विषयाचें एक उपांग आहे. हें निरूपण सापेक्ष-भाषापरिज्ञानाच्या शास्त्राचा विषय आहे व आमचा हा ग्रंथ सामान्यतः भाषापरिज्ञानावर असल्याकारणानें सापेक्षभाषा-परिज्ञानामध्यें आम्ही शिरलों असतां विषयांतर केल्याचा दोष आम्हांवर येईल; परंतु अंगाचें विवरण करीत असतां उपांगाचें विवरण अगदींच अप्रस्तुत होईल असें आम्हांस वाटत नाहीं आणि दुसरें असें कीं, तें उपांग अतिशय महत्वाचें, उपयुक्त व

मनोरंजक असल्याकारणानें त्याचें विवेचन जरी मर्यादेच्या पलीकडे थोडेंसें गेलें तरी सुज्ञ वाचक आम्हांवर रुष्ट होणार नाहींत अशी आम्हांस उमेद आहे.

हिंदुस्तानांत येऊन वर सांगितलेल्या रीतीनें जे लोक कायमचें वास्तव्य करून राहिले ते लोक पूर्वी एशिया-खंडाच्या मध्यभागांत राहत असत. तेथें त्यांच्या आसपास राहणारे जे लोक होते त्यांस "तुराणी" अथवा "त्युरेनियन" असें नांव असे. हा शब्द ज्या धातूपासून झाला आहे त्याच धातूपासून "त्वरा" म्हणजे जलदी व "तुरंगम" म्हणजे घोडा हेही शब्द झाले आहेत. ह्यावरून असें व्यक्त होतें कीं, तुराणी लोक हे त्यांच्या शेजाऱ्यांपेक्षां कमी सुधारलेले असून, ते टोळ्यांटोळ्यांच्या रूपानें राहत असून त्यांचें कायमचें वास्तव्य एके ठिकाणीं नसे. आज एका टोळीचा एके ठिकाणीं मुक्काम, कांहीं दिवसांनीं दुसऱ्या ठिकाणीं ह्याप्रमाणें ते नेहमी स्थलांतर करीत असत. येणें-प्रमाणें सदैव स्थलांतर करीत राहणारे लोक हे अगदीं रानटी स्थितीच्या किंचित् वरचे होत व सुधारणेच्या दृष्टीनें ह्या स्थितीच्या वरची स्थिति शेतकीवर चरितार्थ करून राहणाऱ्या लोकांची होय; कारण समाजघटना ही सृष्टिनियमाप्रमाणें उत्तरोत्तर स्थिरावत जाते व समाजवृद्धीमुळें कायमचें वास्तव्य एका जागीं करून राहण्याची आवश्यकता उत्पन्न होते व तेणेंकरून शेतकीकडे लोकांचें लक्ष्य लागतें. शेतकीवर चरितार्थ करून राहणाऱ्या लोकांची स्थिति सदैव भटकत राहणाऱ्या लोकांच्या स्थितीपेक्षां वरच्या पायरीची होय. असो, एशिया-खंडाच्या मध्यभागीं राहणाऱ्या लोकांची चार हजार वर्षांपूर्वीं कशी समाजघटना होती, हें त्या लोकांचे वाचक शब्द आपणांस ठाऊक आहेत त्यावरून व्यक्त होतें. तुराणी

लोक हे रानटी स्थितींतील असून सदैव भ्रमण करीत असत, हें " तुराणी " ह्या शब्दावरून व्यक्त होतें. कारण " तुराणी " ह्याचा अर्थ भटकणारा किंवा घोड्यावर बसून धांवणारा असा होतो. तुराणी लोकांची ४००० वर्षांमागची स्थिति तुराणी ह्या शब्दावरून व्यक्त होते. त्यांचे शेजारीं असलेले लोक हे कृषिकर्मावर आपला चरितार्थ करीत असत, असें त्यांचा वाचक जो " आर्य " शब्द त्यावरून व्यक्त होतें. हा शब्द नांगरणें ह्या अर्थाचा जो " अर् " धातु ( ल्याटिन् आरो ) त्यापासून झालेला आहे. आणि म्हणून " आर्य " ह्या शब्दाचा अर्थ शेतकी करणारे असा होतो.

ह्याच आर्यलोकांची एक शाखा आग्नेयीकडे निघाली. तिनें आफगाणिस्तान व हिंदुस्तान व्यापिलें व दुसऱ्या शाखेनें वायव्येकडे प्रयाण करून यूरोप-खंड व्यापिलें. ही गोष्ट ह्या दोन्हीं शाखांनीं आपआपल्या भाषा ज्या प्रगल्भ दशेंत आणल्या त्यांच्यांतील शब्दांची परस्परांशीं तुलना केली असतां व्यक्त होते. आग्नेयी दिशेनें आलेल्या शाखेच्या प्रगल्भ अशा प्राचीन भाषा दोन: संस्कृत आणि झेंद; तसेंच वायव्य दिशेनें गेलेल्या आर्य लोकांच्या प्रगल्भ अशा प्राचीन भाषा दोन: ग्रीक आणि ल्याटिन. संस्कृत, झेंद, ग्रीक आणि ल्याटिन, ह्या चार भाषांतील शब्दांची परस्परांशीं तुलना केली असतां कांहीं विलक्षण सादृश्य आढळून येतें व ह्या सादृश्याचा उलगडा भाषैक्याचा व जात्यैकाचा सिद्धांत स्वीकारल्याशिवाय करतां येत नाहीं.

दोन राष्ट्रांचा सांनिध्यामुळें किंवा व्यापारामुळें किंवा जेतृत्वामुळें किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें, बराच वेळ संबंध घडल्यानें त्या राष्ट्रांच्या भाषांमध्यें दान आणि आदान ह्या क्रियांनीं कांहीं शब्द समान होतात; परंतु हे शब्द नवीन शोधून काढ

लेल्या किंवा माहीत झालेल्या पदार्थांचे किंवा कलेनें बनविलेल्या नवीन पदार्थांचे वाचक असतात; किंवा राज्यप्रकरणीं योजले जाणारे ते शब्द असतात; किंवा सूक्ष्म विचारांचे वगैरे वाचक असतात. हे शब्द समाजव्यवस्था पुष्कळ सुधारल्यावर समाजास अवश्य लागणारे असे असतात व अशा रीतीच्या शब्दसादृश्यावरून जात्यैक किंवा भाषैक्य स्थापित करतां यावयाचें नाहीं; परंतु जर हें सादृश्य अत्यंत खालच्या प्रतीच्या समाजाससुद्धां आवश्यक अशा शब्दांत दृष्टिगोचर झालें, तर तें सादृश्य आपणांस जात्यैक व भाषैक्य ह्या कारणांपासून अस्तित्वांत आलें आहे, असें अवश्यमेव कबूल केलें पाहिजे. अत्यंत जवळचीं नातीं दाखविणारे शब्द जे दोन वर्षांच्या मुलाच्या बोबड्या वाचेनें उच्चारले जातात, अगदीं साधीं संख्यावाचकें ज्यांच्याशिवाय अत्यंत रानटी लोकांचा सुद्धां व्यवहार क्षणभरही चालावयाचा नाहीं; शरीराचे अत्यंत मुख्य भाग व पंचेंद्रियें व त्यांचे व्यापार; भूतलावर सर्वत्र आढळणारे पदार्थ व अत्यंत साध्या क्रिया (ज्या क्रिया केल्यावांचून कोणाही मनुष्याला एक दिवससुद्धां जिवंत राहतां यावयाचें नाहीं, अशा क्रिया) यांचे वाचक शब्द जर दोन भाषांत समान आढळतात, तर त्या दोन भाषा पूर्वीं एकच होत्या व त्या भाषा बोलणारे लोक सुद्धां जातीनें एकच होते असें आपणांस बिनधोक अनुमान करतां येईल; अनुमान करतां येईल इतकेंच नव्हे तर भाषैक्याचा व जात्यैक्याचा सिद्धांत आपल्या बुद्धिमंदिरांत जणों काय येऊन घुसेल. हा सिद्धांत स्वीकारल्यावांचून गत्यंतर नाहीं; कारण हा सिद्धांत स्वीकारल्यावांचून ह्या सादृश्याचा उलगडा पडावयाचाच नाहीं.

संस्कृत, झेंद, ग्रीक व ल्याटिन ह्या भाषांतील शब्दांवरून त्या भाषा बोलणारे लोक प्राचीन काळीं एकाच समाजाचे घटक

अवयव होतें, हें सिद्ध होतें व हें पुष्कळच शब्दांवरून सिद्ध होतें. ह्या चारी भाषांमध्यें निषेधार्थक न, व धातूंचे अर्थ बदलणारे उपसर्ग सम्, परि, उपरि, प्र, अंतर्, हे समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें मास इत्यादि नेहमी प्रचारांत लागणारीं कालगणनांचीं साधनें दाखविणारे शब्द समान आहेत; ह्या चारी भाषांमध्ये दम् ( घर, दंपती ह्यांतील पहिला शब्द ) चाक वगैरे रानटी स्थितींतून वर चढून सुधारणेच्या पंथास लागलेल्या लोकांच्या व्यवहारांतील शब्द समान आहेत. ह्याशिवाय ह्या चारी भाषांमध्यें भूतलावर सर्वत्र आढळणाऱ्या पदार्थांचे व दुसरे कांहीं किरकोळ शब्द समान आहेत. पिता, माता, भ्राता, नातू, जांवई, सासरा इत्यादि अत्यंत जवळचीं नातीं दाखविणारे शब्द समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें एक, दोन, तीन, चार, पांच, सहा, सात, आठ, नऊ, दहा, वीस, शंभर, प्रथम, एकदां, दोनदां, सहावा, सातवा, इत्यादि हरहमेश लागणारीं संख्यावाचकें समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें "देव" हा शब्द समान आहे. ह्या चारी भाषांमध्यें, अभ्र, हिम्, ( हिंव ) आप् ( पाणी ) इत्यादि सृष्टींतील स्थूल चमत्कार दाखविणारे शब्द समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें गाय, अश्व, सूकर ( डुकर ) इत्यादि मनुष्यास अति उपयोगी किंवा लवकर माणसाळणारीं जीं जनावरें त्यांचे वाचक शब्द समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें शिर ( डोकें ) आख, हृदय, दांत, अस्थि, पाय, जानु ( गुडघा ), श्रोणी ( ढुंगण ), मन, वाचा, इत्यादि शरीराचे महत्वाचे भाग व इंद्रियें दाखविणारे शब्द समान आहेत. ह्या चारी भाषांमध्यें करणें, देणें, मरणें, स्था ( उभें राहणें ), भार घेणें, होणें, असणें, जाणणें, ताणणें, जन्मणें, वस् ( पांघरणें ), ओकणें, मिह् ( शिंपडणें ), सद् ( बसणें )

पिणें, तासणें, दिश् ( दाखविणें, सांगणें ), मोजणें, युज् ( जोडणें ), पृ ( भरणें ), विद् ( जाणणें ), त्रस् ( भिवविणें ), रुच् ( शोभविणें ) इत्यादि सामान्य क्रिया दाखविणारे शब्द समान आहेत. पहाट, दिवस, रात्र, पाऊस इत्यादि सृष्टिचमत्कारांचीं अभिमानी जीं दैवतें त्यांचे वाचक शब्द समान आहेत.

ही ह्या चार भाषेंतील शब्दांची समानता त्या चारी भाषा बोलणाऱ्या लोकांचें जात्यैक व भाषैक्य व्यक्त करते. हा सिद्धांत कांहीं लहानसान आहे काय? जातिविषयक व भाषाविषयक जे सिद्धांत अर्वाचीन काळीं स्थापित झालेले आहेत, त्या सर्वांमध्यें त्याची योग्यता अधिक आहे. चार हजार वर्षांमागची वस्तुस्थिति कशी होती, हें आपणांस आज निश्चयानें सांगतां येतें, आणि हें अमूल्य ज्ञान आपणांस केवळ शब्दांच्या अभ्यासापासून प्राप्त होतें. असें जर आहे तर शब्दांची योग्यता कांहीं थोडीथोडकी आहे काय? साध्यत्वाच्या दृष्टीनें शब्दांचा अभ्यास करणें हें मोठें लाभप्रद आहे, असें यावरून स्पष्ट होत नाहीं काय?

मागें आम्हीं असें म्हटलें आहे कीं, मध्य एशियांतून आर्यलोकांच्या ज्या दोन शाखा निघाल्या त्यांपैकीं आग्नेयी दिशेनें जिनें प्रस्थान केलें, तिनें कांहीं काळपर्यंत इराणांत व आफगाणिस्थानांत वास्तव्य केलें, व असा सिद्धांत ठरविण्याचीं प्रमाणेंही शब्दसादृश्यावरूनच मिळतात. आग्नेयी दिशेनें आलेल्या आर्यांनीं अभियुक्त केलेल्या ज्या दोन भाषा झेंद व संस्कृत ह्यांच्यामध्यें जे समान असे शब्द आहेत, ते वायव्य दिशेनें गेलेल्या आर्यांनीं अभियुक्त केलेल्या भाषा ज्या ग्रीक आणि ल्याटिन् त्यांच्यांशीं झेंद व संस्कृत भाषांचे जे समान शब्द आहेत, त्यापेक्षां अधिक आहेत. म्हणजे असें कीं ग्रीक, ल्याटिन्, झेंद

व संस्कृत ह्या चारी भाषांना समान असे जे शब्द आहेत, त्यांची संख्या झेंद व संस्कृत ह्या दोन भाषांना समान असलेल्या शब्दांच्या संख्येपेक्षां लहान आहे. आणि असें असणें हें साहजिकच आहे. कारण, वायव्यगामिनी शाखेचा व आग्नेयीगामिनी शाखेचा संबंध एकमेकींशीं कमी काळ म्हणजे मध्य एशियांत त्यांचें वास्तव्य असे तोंपर्यंतच असल्या कारणानें त्यांच्यामध्यें समान शब्दांची संख्या कमी असावयाची. व आग्नेयीगामी आर्यांचा संबंध एकमेकांशीं अधिक काळपर्यंत म्हणजे मध्य एशियांत असतांना व इराण आणि आफगाणिस्तानांत असतांनाही असल्यामुळें व भाषेमध्यें नवीन नवीन आचारविचारांचे वाचक शब्द उत्पन्न होत असल्यामुळें त्या लोकांच्या पोटशाखा झाल्या, तेव्हां त्यांच्यामध्यें समान अशा शब्दांची संख्या अधिक असणारच. झेंद आणि संस्कृत ह्या भाषांत समान असलेल्या शब्दांची संख्या पाहिली असतां वरील सिद्धांताची सत्यता स्पष्ट करून येण्याजोगी आहे. ग्रीक, ल्याटिन् , संस्कृत व झेंद ह्या चार भाषांत कोणचे शब्द समान आहेत ते वर सांगितले आहेत. आतां ह्या शब्दांखेरीज जे दुसरे कांहीं शब्द झेंद व संस्कृत ह्यांत समान आहेत ते येणेंप्रमाणें. पुत्र, मित्र, स्वसृ ( बहीण ) वगैरे अत्यंत जवळचीं नातीं दाखविणारे शब्द; साठ, सत्तर, ऐंशी, नव्वद, हजार, निमा वगैरे हरहमेश लागणारे संख्यावाचक शब्द; उंट, कासव, कृमि, खर ( गाढव ), गाय, मासा, माशी, मेंढा वगैरे मनुष्यास उपयोगी पडणारे किंवा लवकर माणसाळणारे प्राणी किंवा पृथ्वीवर प्राचुर्यानें आढळणारे प्राणी, ह्यांचे वाचक शब्द; अंगठा, मूठ, श्रवण, स्तन, अश्रु, हाड, गंध, हात, घाम, चक्षु, जिव्हा, तनु, तृष्णा, पार्ष्णि ( टांच ), मेंदु, पाठ, वगैरे शरीराचे महत्वाचे

भाग, व इंद्रियें, व त्या इंद्रियांचे व्यापार ह्यांचे वाचक शब्द; आप् ( मिळविणें ) कसणें, चालणें, तापणें, दह् ( जाळणें ), धमणें ( फुंकणें ), जाणणें, नमणें, नमस् ( नमस्कार ), पचणें ( शिजविणें ), पडणें, पुसणें ( विचारणें ), पाठविणें, हन् ( मारणें ), बांधणें, मर्दणें, मरणें, रुजणें, वर्षणें, शकणें, शोधणें, स्वन् ( शब्द करणें ), स्वप् ( निजणें ), स्तविणें वगैरे सामान्य क्रिया दाखविणारे शब्द; दार, धान्य वगैरे सुधारणेच्या पंथास लागलेल्या समाजाचे शब्द; दारु ( लांकूड ), भूमि वगैरे सर्वत्र आढळणारे पदार्थांचे वाचक शब्द; आभाळ, उष्णता, तेज, मेघ, वात ( वारा ), क्षपा ( रात्र ), वगैरे सृष्टींतील चमत्कार व पंचमहाभूतें ह्यांचे वाचक शब्द; अयस् ( लोखंड ), हिरण्य ( सोनें ), वगैरे महत्वाचे धातू ह्यांचे वाचक शब्द; आराम, शेत, लांब, दूर, नेदिष्ट ( जवळ ), पूर्ण, भिषज्, मर्त्य, महा, यव, जादू, रास्त, श्याम, श्वेत, संगम, सर्व, स्व, क्षीर इत्यादि इतर किरकोळ शब्द; हे ह्या दोन्ही भाषांत समान आहेत. शब्दांच्या अभ्यासापासून हें जें गत गोष्टीचें ज्ञान आपणांस प्राप्त होतें तें किती मौल्यवान् आहे बरें? येथवर आम्हीं जो विचार केला आहे, तो मुख्यत्वेंकरून सापेक्षभाषापरिज्ञानाचा विषय व गौणत्वानें किंवा उपांगत्वानें भाषापरिज्ञानाचा विषय आहे; ह्या उपांगाचा विचार विस्तारें करून केलेला कोठेंही आढळत नाहीं. ह्यासंबंधानें आमच्या वाचकांनीं अगदींच अपरिचित राहूं नये म्हणून आम्हीं इतका विस्तार करण्याचा प्रयत्न केला आहे. आतां आम्हीं मुख्य विषयाकडे वळतों.

आर्य लोक उत्तर हिंदुस्तानांत शेंकडों वर्षें राहून नंतर दक्षिणेंत आले. ह्याचा पुरावा **आर्यावर्त** व **दक्षिण** ह्या शब्दांत

आहे. "आर्यावर्त" म्हणजे आर्यांच्या वसतीचें ठिकाण; विंध्य व हिमालय ह्या पर्वतांच्या ओळी ज्याच्या दक्षिणोत्तर मर्यादा आहेत, आणि सिंधु व ब्रह्मपुत्रा ह्या नद्या ज्याच्या पूर्वपश्चिम मर्यादा आहेत, असा जो देश त्याचा वाचक "आर्यावर्त" हा आहे व "आर्यावर्त" ह्याचा शब्दार्थ "आर्यांचा आवर्त" म्हणजे वसतिस्थान असा आहे. वर निर्दिष्ट केलेल्या प्रदेशांत आर्यांचें पुष्कळ दिवस वास्तव्य झाल्याकारणानें त्यास सहजच "आर्यावर्त असें नांव प्राप्त झालें व पुढें आर्यलोक विंध्यपर्वतास ओलांडून दक्षिणेंत येईतोंपर्यंत आर्यावर्त हें नांव, विंध्य व हिमालय, ह्यांच्या मधील प्रदेशास रूढ झाल्यामुळें त्याची व्याप्ति विंध्याच्या दक्षिणेकडील आर्यांच्या वसतिस्थानावर होऊं शकेना. आर्यावर्ताच्या दक्षिणेकडील प्रदेशास म्हणजे विंध्याच्या दक्षिणेकडील प्रदेशास "दक्षिणापथ" किंवा "दक्षिण" असें नांव प्राप्त झालें. तेव्हां "दक्षिणापथ" किंवा "दक्षिण" हीं नांवें आर्यावर्ताच्या अपेक्षेनें दिलेलीं आहेत हें उघड आहे. आर्यलोक दक्षिणेकडून हिंदुस्तानांत प्रवेशून नंतर विंध्यपर्वताच्या पलीकडे गेले असते तर विंध्याच्या खालच्या प्रदेशास "आर्यावर्त" असें नांव पडून विंध्य व हिमालय यांच्या मध्यगामी प्रदेशास "उत्तरापथ" किंवा "उत्तर" असें नांव पडलें असतें.

विंध्यपर्वतास किंवा निदान त्याच्या कांहीं भागास **पारियात्र** असें दुसरें एक नांव आहे. याचा अर्थ "यात्रेची मर्यादा" असा होतो. ह्यावरून सुद्धां हेंच सिद्ध होतें कीं, आर्यलोकांचा विस्तार त्या पर्वतानें पुष्कळ काळपर्यंत मर्यादित व कुंठित झाला होता.

आकाशाच्या दक्षिणगोलार्धांत "नौका" म्हणून एक तारकापुंज आहे. त्यामध्यें **अगस्त्य** म्हणून एक तारका आहे. ही तारका पहिल्या प्रतीची आहे. आर्यलोकांनीं विंध्यपर्वत ओलांडला, तेव्हां अति भव्य व अति तेजस्वी असे नवे तारकापुंज त्यांच्या दृष्टीस पडले. प्रथमच दक्षिणेकडे जे आर्य आले त्यांस अफाट अंतरिक्षांतील भव्य व मनोहर देखावा पहिल्यानेंच जेव्हां दृष्टिगोचर झाला, तेव्हां त्यांच्या चित्तवृत्तीस किती आनंद झाला असेल? त्यांच्या ह्या आनंदाचें द्योतक "अगस्त्य" या नांवामध्यें आपणांस सांपडतें; अत्यंत दक्षिणेकडची, अत्यंत तेजस्वी, क्षणाक्षणांत तांबडा, पिंवळा, निळा, अस्मानी, हिरवा, असे वेगळे वेगळे रंग दाखविणारी व अंतरीक्षांतील असंख्य तारकांवर जणों साम्राज्य भोगणारी ही मनोहर तारका जर इहलोकींच्या मनुष्याच्या नांवानें निर्दिष्ट करावयाची होती तर तिला कोणच्या भाग्यशाली पुरुषाचें नांव देणें साहजिक होतें! ज्या साहसी पुरुषानें आर्यलोकांस ह्या नव्या व सुपीक देशाची ओळख करून दिली, त्याचेंच नांव तिला देणें साहजिक होतें. तर ह्या "अगस्त्य" नांवावरून असें उघड आहे कीं "अगस्त्य" या नांवाच्या आर्यपुरुषानें प्रथम विंध्यपर्वताच्या दक्षिणेकडे आगमन केलें. हें अनुमान खरें आहे असें दुसऱ्या अनेक प्रमाणांवरून ठरलेलें आहे.

आर्यलोक हे उत्तरेकडून दक्षिणेकडे आले, दक्षिणेकडून उत्तरेकडे गेले नाहींत, हें ठरविण्याचें दुसरें एक साधन आहे. हिमालय आणि विंध्य ह्यांच्या मधील प्रदेशांत वर्षाच्या साऱ्या ऋतूंमध्यें हिंवाळा हा मुख्य लक्षांत धरण्यासारखा आहे. म्हणून वर्षाची गणना ह्या ऋतूवरून होऊं लागली

व सहजच " शरद् " हा शब्द वर्षाचा वाचक झाला. परंतु विंध्याच्या दक्षिणेकडे विशेष लक्षांत बाळगण्याजोगा ऋतु पावसाळा होय. त्यामुळें वर्षास त्या ऋतूचें नांव ( वर्षा ) असें पडलें. आणि शरद् व वर्षा ह्या दोन शब्दांमध्यें पहिला अधिक प्राचीन शब्द आहे असें आपणांस अन्य आधारांवरून ठरवितां येतें. तर " वर्षा " हा शब्द नंतरचा असल्या-कारणानें आर्यलोक पूर्वी विंध्याच्या उत्तरेस असून, नंतर दक्षि-णेस आले असें सिद्ध होतें. आपल्या बायका, मूल शिंकलें असतां " सत्तंजी " असें म्हणतात. हा शब्द " शतं जीव शरदः शतं " ह्या वैदिक आशीर्वादाचा अपभ्रंश आहे. ह्या आशीर्वादांत " शरद् " शब्द वर्ष ह्या अर्थानें योजलेला आहे.

येथवर शब्दांवरून हिंदुस्तानचा प्राचीन इतिहास कसा कसा समजतो हें आम्हीं वाचकांस स्पष्ट करून सांगितलें. आतां अर्वाचीन काळचा इतिहास शब्दांवरून कसा समजतो हें सांगतों.

प्रथम **महाराष्ट्र** शब्द आपणांस कोणचें गतवृत्त सांगतो हें पाहूं. " महाराष्ट्र " ह्या शब्दाचा लौकिक अर्थ, मोठें राष्ट्र असा आहे; परंतु खरा अर्थ तसा नाहीं. हल्लीं ज्या देशास आपण " महाराष्ट्र " असें म्हणतों, तेथें सुमारें २१५० वर्षां-पूर्वी " रठ्ठ " नांवाचे पराक्रमी लोक राहत असत. भोज-लोकांनीं जसें आपणांस " महाभोज " हें नांव घेतलें त्याच-प्रमाणें " रठ्ठ" लोकांनीं आपलें महत्व दाखविण्यासाठीं आपणांस व आपल्या देशास " महारठ्ठ " असें नांव घेतलें. " महारठ्ठ " या शब्दाचें वर्णसादृश्यावरून " महाराष्ट्र " असें रूपांतर केलें जाऊन हा " महाराष्ट्र " असा शब्द ग्रंथांत व शिलालेखांत व ताम्रपटांत योजला जाऊं लागला.

भूमीच्या पृष्ठभागावर अनादिकाळापासून वेगळ्या वेगळ्या द्रव्यांचे वेगळे वेगळे थर एका मागून एक बसत गेले, त्यांच्या परीक्षणावरून भूगर्भशास्त्रवेत्त्यांस भूमीच्या विशिष्ट प्रदेशास कोणकोणत्या दशा प्राप्त झाल्या हें समजतें. या दशा येण्यास कोणकोणच्या प्रेरणा किती किती अंशानें कारणीभूत झाल्या हें ठरवितां येतें. त्याचप्रमाणें भाषाशास्त्रवेत्त्यांस शब्दांपासून ज्ञान प्राप्त होतें. आपली मराठी भाषा ही अनेक भाषांच्या संयोगापासून बनलेली आहे. ह्या भाषांतील शब्दांचे थर जे मराठी भाषेच्या पायावर एका मागून एक बसत गेले त्यांवरून आपणा मराठ्यांच्या डोक्यांवरून कोणकोणत्या राजकीय, सामाजिक, नैतिक व धार्मिक लाटा येऊन गेल्या, त्यांचें स्वरूप उत्कृष्ट रीतीनें ठरवितां येईल आणि हें स्वरूप इतकें हुबेहुब ठरवितां येण्याजोगें आहे कीं त्यावरून आपल्या महाराष्ट्र देशाचा इतिहास आपणांस रचितां येईल. आम्हीं या विषयांत फार खोल न जातां साधारण अवलोकनानें ज्या गोष्टी सिद्ध होण्याजोग्या आहेत त्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.

मराठी भाषेमध्यें जे फारशी किंवा आरबी शब्द सामील झाले आहेत, त्यांवरून आपणां मराठ्यांचा व मुसलमानांचा संबंध कोणत्या प्रकारचा होता, हें आपणांस ठरवितां येईल; सर्व बखरी, इतिहास आणि इतर तज्जातीय ग्रंथ जरी ठार बुडून गेले असते, तरी आपणांस मराठी भाषेंत सामील झालेल्या शब्दांवरून मुसलमानांचा व आपला संबंध काय होता, हें ठरवितां आलें असतें. मुसलमानी लोक कांहीं काळपर्यंत आपले राजे होते. ते आपल्या देशाचे स्वामी होते. त्यांनीं राजकीय व्यवस्थेसाठीं देशाचे विभाग केले होते. शेतकी जमीनीवर त्यांची मालकी होती, दिवाणी व फौजदारी खटल्यांचे

निवाडे करण्याचा अधिकार त्यांजकडे होता व हे निवाडे करण्याची पद्धतीही त्यांचीच होती; बहुमानाच्या पदव्या तेच आपणांस देत होते, हें भाषेंत सामील झालेल्या शब्दांचे अर्थ व संख्या हीं पाहिलीं असतां लक्षांत येण्याजोगें आहे. ह्या एकंदर शब्दांच्या बिनबाकी यादी देणें अशक्य आहे. त्या वाचकांनीं कै. गोविंद शास्त्री बापट यांच्या व्युत्पत्तिप्रदीपांत पाहाव्या. येथें कांहीं कांहीं निवडक शब्द मात्र देतों. देशाचे राजकीय विभागांचे वाचक शब्द, इलाखा, जिल्हा, तालुका, मौजे, कसबा, महाल इ०; न्याय पद्धतींतील पारिभाषिक शब्द अदालत, फिर्याद, अर्ज, इनसाफ, कज्जा, कबुलायत, कानू, कायदा, जप्ती, मंजूर, जामीन, वकील, सवाल, शाबीद, वारस, लवाद, दस्तैवज, फारखत, फैसल्ला, मुनसफ, दिवाणी, फौजदारी, सजा, कैद इ०; शेतकीच्या व्यवस्थेचे शब्द मीरास, मशागत, जमीन, कर्याद, बागाईत, जिराईत, तक्षीम, वसूल इ०; पदव्या व पदव्यांचा संमान व तत्संबंधीं इतर प्रकारचे शब्द अज्जम, अदबी, अमीर, उमराव, किताब, खासास्वारी, ताजीम, तैनात, दर्जा, मरातब, हुद्दा, नाझर, फडणीस इ०.

या वरील शब्दांच्या संग्रहाचें वरवर जरी अवलोकन केलें तरी हा सिद्धांत कबूल करणें सर्वांस भाग पडेल कीं, मुसलमानी अमलाखालीं आपण कांहीं दिवस होतों; जमीनीची वांटणी करून, त्याचा वसूल घेणें, शेतकऱ्यांवर देखरेख ठेवणें, वगैरे गोष्टी मुसलमानी पद्धतीवर होत असत, त्याचप्रमाणें बहुमानाच्या पदव्या देण्याचा अधिकारही त्यांच्याचकडे असे; वर निर्दिष्ट केलेल्या प्रकारचे शब्द आपल्या भाषेशीं मिलाफ पावून, तिच्याशीं एकजीव इतके कसे झाले, ह्या प्रश्नाचा उलगडा वरचा सिद्धांत स्वीकारल्याशिवाय व्हावयाचा नाहीं.

आपल्या भाषेंतील अरबी व फारशी शब्द सहज वरवर जरी चाळले तरी दुसरी एक गोष्ट आपणांस कबूल केल्याविना गत्यंतर नाहीं; ती ही कीं, मुसलमानी लोक आपल्यापेक्षां अधिक ऐषआराम करीत असत. त्यांचा ऐषआरामही त्यांच्या अंगांत अगदीं खिळून गेला होता व त्यांचे ऐषआरामाचे कांहीं प्रकार तर आपणांस अगदीं अश्रुतपूर्व असे होते. अत्तर, अंबारी, आषक, आषुक, माषुक, इष्की, ऐषआराम, किंतान, ख्याल, जवाहीर, नक्षी, तबक, तसबीर, तजेला, खुबसुरत, बिदागी, नजराणा, मौज, नूर, तंबुरा, मखमाल, मिना, मेहरप, महाल, इत्यादि शब्दांवरून वर सांगितलेलें अनुमान आपणांस सहज करतां येतें. मराठी भाषेंत सामील झालेल्या पारशी व आरबी शब्दांवरून दुसरें असेंही एक अनुमान आपणांस सहज करतां येणारें आहे कीं, सरकारच्या सर्व बाबींचें दफ्तर मुसलमानीमध्यें ठेविलें जात असे. कारण हे दफ्तरी शब्द आपल्या भाषेमध्यें भरपूर आहेत. दफ्तर, हिशेब, जमा, खर्च, रकाना इत्यादि. आपणांवरील मुसलमानी अंमल नाहींसा झाल्यावरसुद्धां त्याच पद्धतीवर मराठे व पेशवे ह्यांचें दफ्तर ठेविलें जात असे; अजूनसुद्धां–म्हणजे इंग्रजी अमलांत-सुद्धां–देशी भाषेंतील दफ्तर त्याच पद्धतीवर ठेवलें जात आहे. हल्लीं सन मात्र येशूखिस्ती चालतो.

ह्याशिवाय दुसराही एक मोठा महत्वाचा मुद्दा आपणांस कळतो; तो हा कीं, मुसलमानी लोक हे आपणांपेक्षां कांहीं प्रकारच्या कलाकौशल्यांत अधिक प्रवीण होते. कांहीं कला-कौशल्यें जीं आपणांस मुळींच ठाऊक नव्हतीं, तीं त्यांनीं आपणांस शिकविलीं व बांधकामांची त्यांची शैली आपल्या शैली-पेक्षां भिन्न असून ती आपल्याइतकी व कांहीं बाबतींत आपणां-

पेक्षां अधिक सुंदर होती. ह्या सिद्धांताच्या समर्थनार्थ कांहीं शब्द देतों :—रफूगार, शिकलगार, बेलदार, कशीदा, तमाशा, वस्ताद, सुतार, सनई, तासा, तंबुरा, नौबत, किंतान, संजाप, रेशिम, मुलामा, मेणा, कुलूप, कंदील, कनात, पैलू, तावदान, शिसा, बिल्लोर, बर्फी, हैवान, मेहरप, घुमट, दालन, मनोरा, बिनी, इत्यादि. ह्या शब्दांचे अवलोकनावरून वाचकांस असें आढळून येईल कीं, ह्यांपैकीं एखाददुसरा शब्द खेरीजकरून बाकीच्या शब्दांस आपल्या भाषेंमध्यें मुळींच पर्यायशब्द नाहींत, आणि नांवाच्या अभावावरून वस्तूचाही अभाव—निदान त्या वस्तूचा आपणांमध्यें कमी फैलाव—सिद्ध होतो.

वर जीं हीं अनुमानें शब्दांच्या अवलोकनावरून निघणारीं आहेत तीं सारीं खरीं आहेत, असें इतिहासावरून आपणांस विदितच आहे.*

---

* पुढील उताऱ्यांतून मूर्खपणा व अतिशयोक्ति ह्यांबद्दल सावकारी कटमिति बाद केली असतांसुद्धां आमच्या म्हणण्यांस पुष्टि आणणारा बराच भाग राहील असें आम्हांस वाटतें.

Baber's account is amusing, being written with all the violent prejudice still felt by persons just arrived from Kabul or from Europe. "Hindoostan is a country that has few pleasures to recommend it. The people are not handsome. They have no idea of the charms of friendly society or frankly mixing together, or of familiar intercourse. They have no genius, no comprehension of mind, no politeness of manners, no kindness, no fellow-feeling, no ingenuity or mechanical invention in planning or executing their handicraft works: no skill or knowledge in design or architecture; they have no good horses; no good flesh, no grapes, or musk melons, no good fruits, no ice or cold water, no good food or bread in their bazaars, no baths or colleges, no candles no torches, not a candlestick." He then goes on to ridicule their clumsy substitutes for the last useful articles.

Erskin's Baber P. 333.

आतां आपल्या प्राचीन पद्धति व आचारविचार, अभ्यासक्रम वगैरे हीं शब्दांवरून कशीं व्यक्त होतात हें पाहूं.

**श्रुति** ह्या शब्दावरून प्राचीन काळची अध्ययन व अध्यापन पद्धति ही कशी होती हें समजतें. "श्रुति" म्हणजे ऐकून संपादावयाचें ज्ञान. "श्रुति" हा शब्द वेदास लावतात. यावरून प्राचीन काळीं पुस्तकावरून अध्ययन करण्याची चाल नसे असें सिद्ध होतें. आपले वेद सुमारें ४००० वर्षांपूर्वी रचले गेले, तथापि त्यांत एका अक्षरासंबंधानें किंवा यःकश्चित् कान्यामात्रासंबंधानें पाठभेद नाहीं; यावरून तरी हीच गोष्ट सिद्ध होते. पुस्तकांत लिहिलेला लेख लेखकाच्या निष्काळजीपणामुळें अशुद्ध होतो; परंतु गुरूच्या मुखांतून निघालेला पाठ केवळ कानांनींच ऐकून ग्रहण करावयाचा असतो, ह्यामुळें शिष्यास चित्ताची एकाग्रता करावी लागते व एकाग्रचित्तानें ग्रहण केलेला पाठ शुद्ध असून शिवाय लवकर पदरांत पडतो. अशा रीतीनें मागपासून गुरुपरंपरेनें वेदपठण आजपर्यंत चालत आलें आहे. पुस्तकांतून पठण करण्याची पद्धति जुन्या लोकांनीं निंदिलेली आहेः—

**गीती शीघ्री शिरःकंपी तथा लिखितपाठकः ।**
**अनर्थज्ञोऽल्पकंठश्च षडेते पाठकाधमाः ॥**

**उपनयन, विवाह** ह्या शब्दांवरून आपल्या लोकांच्या प्राचीन सांसारिक आचारांची परिस्फुटता होते. "उपनयन" म्हणजे "जवळ नेणें." प्राचीन काळीं मुलाची शैशवावस्था अवसित झाली म्हणजे त्यास विद्योपार्जनासाठीं गुरूकडे नेत असत व हाच गुरु त्या मुलाची मुंज करीत असे. मुंज झाल्यावर गुरूचे आश्रमींच हा मुलगा कांहीं काळपर्यंत राहत असे व त्याची सेवा करून विद्योपार्जन करीत असे. तें संपूर्ण झाल्या-

नंतर तो स्वगृहाप्रत परत येऊन गृहस्थाश्रमाचा स्वीकार करीत असे. " उपनयन " ह्या शब्दानें आपले प्राक्कालीन आचार कसे असत व हल्लीं त्यांत किती फरक पडला आहे, हें वाचकांस कळून येईल. त्याचप्रमाणें **विवाह, उद्वाह** हेही शब्द आपले प्राक्कालीन आचार परिस्फुट करतात. ह्या शब्दांचा अर्थ "वाहून आणणें" आहे. मुलानें स्वतः हिंडून आपल्या मनाला योग्य वाटेल ती कुमारिका स्वीकारून ती घरीं आणून सहधर्मचारिणी करावी अशी चाल असे. हल्लींच्या काळीं मुलीचा बाप घरोघर आणि दारोदार हिंडून लोकांचा अपमान निमूटपणें सहन करून तिला योग्य वर पाहतो व " दारिका हृदयदारिका पितुः " ह्या सुभाषित वचनाची प्रतीति अनुभवितो.

**आचार्य** ह्याचा अर्थ गुरु, विद्वान् असा आहे. ह्या शब्दावरून पूर्वी विद्यार्थी लोक गुरूपासून कोणच्या रीतीनें ज्ञानप्राप्ति करून घेत असत हें आपणांस स्पष्ट समजतें. " चर् " धातूस " आ " हा उपसर्ग लागून सेवा करणें असा अर्थ होतो. ह्यावरून " आचार्य " ह्याचा अर्थ सेवा करावयास योग्य किंवा ज्याची सेवा करावयाची आहे तो, असा होतो. गुरूस द्रव्य देऊन त्याजपासून विद्या प्राप्त करून घ्यावयाची हा एक मार्ग आहे व आज हाच सुरू आहे. दुसरा विद्योपार्जनाचा मार्ग गुरूची सेवा करून त्याजपासून विद्यालाभ करून घेणें. हा दुसरा मार्गच प्राचीन काळीं होता असें आचार्य शब्दावरून व्यक्त होतें. कारण सेवा करावयास योग्य या अर्थाचा आचार्य हा शब्द गुरु ह्या शब्दाशीं समानार्थक आहे.

**उपाध्याया** आणि **आचार्या** ह्या शब्दांवरून प्राचीन काळीं स्त्रिया सुद्धां विद्वान् असून विद्यादानाचें काम करीत असत असें व्यक्त होतें. कारण उपाध्यायानी व आचार्यांनी ह्या शब्दांचा

उपध्यायाची किंवा आचार्याची स्त्री इतका अर्थ होतो, परंतु "उपाध्याया" आणि "आचार्या" हे शब्द स्वत: विद्वान् असून विद्यादान करणारी स्त्री असा अर्थ दाखवितात. स्त्रिया जर विद्वान् व विद्यादान करण्याचें काम करणाऱ्या नसत्या, तर "उपाध्याया" व "उपाध्यायानी" किंवा "आचार्या" व "आचार्यानी" हे भेदद्योतक शब्द उत्पन्न झाले नसते.

**अंकित** हा शब्द संस्कृत अंक् ( खुणा करणें ) या धातूपासून आलेला आहे. आणि "अंकित" म्हणजे ज्यावर कांहीं खुणा केलेली आहे असा. हल्लीं आपण "अंकित" ह्याचा मराठींत सेवक असा अर्थ करतों. यावरून पूर्वीं राजादिकांच्या सेवकांच्या अंगावर कांहीं तरी सेवकपणाचें चिन्ह असे हें व्यक्त होतें.

भाषेंतील शब्दांवरून आपणांस अनेक प्रकारची माहिती मिळते असें आम्हीं वारंवार मागें म्हटलेलें आहे. भाषेंतील शब्दांवरून देशाची हवा समजते असें आम्हीं म्हटलें तर कित्येक वाचकांस तें खरें सुद्धां वाटणार नाहीं; परंतु हा त्यांचा अविश्वास निरस्त करण्यास आपणांजवळ शब्दांचें साहित्य आहे. आपण सुखकर वस्तूचे ठायीं शीतता व आर्द्रता ह्या गुणांचा आरोप करतों. उदाहरणार्थ आपण असे प्रयोग करतों:— "त्याचें अंतःकरण दयेनें आर्द्र झालें"; "दयार्द्र अंतःकरणानें त्यानें त्या हतभाग्य स्त्रीस दोन आणे दिले;" "हें मूल भुकेनें व्याकुळ झालें होतें, परंतु त्याला थोडेंसें दूध पाजल्याबरोबर तें थंडावलें;" "त्या मुलाचे ते बोबडे बोल ऐकून त्या स्त्रीच्या अंतःकरणास प्रेमाचा पाझर फुटला;" "तो राजाच्या छायेमध्यें आहे" इ०; त्याचप्रमाणें सुंदर स्त्रीच्या मुखास चंद्रबिंबाची उपमा देणें, आलिंगिलेल्या स्त्रीच्या गार अंगाची प्रशंसा करणें,

इत्यादीवरूनसुद्धां वरील सिद्धान्ताची सत्यता स्थापित होते. इंग्रेजी भाषेंत आपणांस ह्याच्या उलट प्रकार दृष्टीस पडतो; म्हणजे सुखकर वस्तूचे ठायीं उष्णतेचा आरोप केलेला दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ पुढील प्रयोग घ्या:—Warm friendship ( कढत मैत्री ); Ardent love (ऊनऊन प्रीति); Fervid gratitude ( जळणारी कृतज्ञता ); Hot kisses ( उष्ण मुके ); Glowing embrace (कढत आलिंगन ) Sunny face (सूर्यासारखें तोंड) इ०. याचप्रमाणें पुढील प्रयोगही होतः— " He was basking in the favour of the king " (तो राजाच्या प्रीतिरूप उन्हांत शेकत होता.) इ०. ही इंग्रेजी व मराठी प्रयोगांमध्यें भिन्नता कां असावी? आपण सुखकर वस्तूचे ठायीं शीतता व आर्द्रता ह्या गुणांचा कां आरोप करावा? ह्या शंकेचा उलगडा थोडक्यांत आहे. आपणांस हिंदुस्तान व इंग्लंड ह्या दोन देशांची हवा कशी आहे हें मनांत आणलें म्हणजे पुरे आहे. आपला देश उष्ण कटिबंधांत असल्या कारणानें इकडे उष्णतेचें मान अधिक असतें. ह्यामुळें आपणांस शीत व आर्द्र पदार्थ गोड वाटतात आणि त्यामुळें सुखकर वस्तूचे ठायीं ते गुण आपण आरोपितों. जी गोष्ट प्रियकर असून दुर्मिळ आहे, तिच्याविषयीं आपल्या मनांत आदर उत्पन्न व्हावा हें साहजिक आहे. आपल्या इकडे सारे पदार्थ उष्ण असतात, व अंग गार करण्यासाठीं पाण्याची कमतरता असते, ह्यामुळें शीतता व आर्द्रता हीं आपणांस प्रियकर वाटतात व सहजच आपण त्या गुणांचा आरोप सुखकर वस्तूंचे ठायीं करतों. "प्रेमाचा पाझर" ह्या उदाहरणामध्यें प्रेमास पाझराची उपमा आपण देतों. परंतु इंग्लंड देश हा अधिक थंडीच्या कटिबंधांत असल्या कारणानें तेथें नेहमीं थंडी असते, व बहुतकरून बारा महिने

पाऊस पडत असल्याकारणानें तेथें पाण्याची कांहीं वाण नसते आणि म्हणून ऊबदारपणा, उष्णता, सूर्य, इत्यादि पदार्थ तेथील लोकांस गोड वाटतात. म्हणून ते साहाजिकच सुखकर वस्तूचे ठायीं उष्णतेचा आरोप करितात. इंग्रज Sunny face ह्या शब्दानें गालांचा गोडपणा, सुरेखपणा, मोहकपणा दर्शवितात; परंतु आपण त्याच्या उलटपक्षीं चंद्रानन असें म्हणतों. सूर्यानन असें म्हणण्याकडे कधीं आपली प्रवृत्ति होत नाहीं.

ह्या वरील विवेचनावरून वाचकांचे लक्षांत आलेंच असेल कीं, देशाचीं हवा, पाणी हीं सुद्धां भाषेच्या शब्दांस आपणांस अनुरूप असे करून घेतात. म्हणून अर्थात् शब्दांचें योग्य परीक्षण केल्यास देशाची हवा, पाणी वगैरे हीं सुद्धां आपणांस समजतात. आम्हीं जीं उदाहरणें दिलीं आहेत तीं अर्थात् स्थूल आहेत. पण याच्यापेक्षां अधिक सूक्ष्म शोध करण्यास जर कोणी मनुष्य प्रवृत्त झाला तर त्यास शब्दांमध्यें पुष्कळ उपयुक्त सामग्री मिळेल असें आम्हांस वाटतें.

**नाशीक:**—स्थळांचीं नांवें सुद्धां पुष्कळ माहितीनें भरलेलीं असतात. हल्लीं ज्यास नाशिक असें म्हणतात, त्यास पूर्वी जनस्थान हें नांव होतें. पूर्वीचें नांव माजी पडून नाशिक हें नांव रूढ होण्याचें कारण हें कीं रावणाची बहीण शूर्पनखा हिनें राम व लक्ष्मण वनवासांत असतां त्यांस उपद्रव देण्याचा प्रयत्न केल्यावरून लक्ष्मणानें तिची नासिका (नाक) छेदिली. ह्या पुराणप्रसिद्ध गोष्टीचें नाशिक हें नांव स्मरण करून देतें. **काश्मीर** हें नांव केशराची (कश्मीराची) उत्पत्ति त्या देशांत फार होते यावरून पडलेलें आहे. **वाराणसी** (काशी) हें नांव "वरुणा" आणि "असी" ह्या नद्यांचें त्या स्थळाशीं सान्निध्य असल्यावरून पडलेलें आहे. **परशुरामक्षेत्र** हें

कोंकणपट्टीचें नांव पुष्कळ गोष्टींची माहिती देतें. परशुरामानें क्षत्रियांचा बीमोड करून भूमीचें दान कश्यप ऋषीस दिलें, व दान दिलेल्या देशांत राहणें योग्य नाहीं असें जाणून परशुरामानें समुद्रापासून सह्याद्रीच्या पायथ्याचा पश्चिमेकडचा प्रदेश मागून घेतला, आणि तेथें तो तपश्चर्या करीत राहिला. ह्यावरून ह्या प्रदेशास परशुरामक्षेत्र हें नांव पडलें. परंतु परशुरामानें स्वतः ह्या प्रांतास जें नांव दिलें तें "शूर्पारक" हें होतें. ही पौराणिक कथा परशुरामक्षेत्र ह्या नांवांत दृष्टीस पडते. ह्या पौराणिक कथेचें महत्त्व बाजूला ठेवलें तरी भूशास्त्रदृष्टया ही मनोरंजक माहिती मिळते कीं, कोंकणपट्टीचा प्रदेश धरणीकंपादि कारणांनीं वर उचलला जाऊन कोरडा झालेला आहे, व तोही फार प्राचीन काळीं कोरडा झालेला आहे, असें नव्हे.

**साळशी** हें नांव एका चमत्कारिक प्रस्तावाची आठवण करून देतें. रत्नागिरी जिल्ह्यांत देवगड तालुक्यांत साळशी म्हणून एक गांव आहे. तेथील अमलदारानें सर्व आळशी लोकांस जेवायास फुकट घातलें जाईल अशी दंवडी पिटविली. आयतें जेवायास मिळतें तर संधि कोण दवडणार? एक आला, दुसरा आला, तिसरा आला, या प्रमाणें हजारों लोक जमले; व जो येई तो "मी आळशी आहें" असें म्हणे. ह्या खुशालचंदांची संख्या वाढत चालली. यथेच्छ भोजन करणें, व झोंपा ताणणें हें जर श्रमावांचून मिळूं लागलें तर असा कोण मायेचा पूत आहे कीं जो ती संधि दवडील? अशा रीतीनें सरकारास अधिक अधिक त्रास होऊं लागला. तेव्हां खरे आळशी ठरविण्यासाठीं त्या अम्मलदारानें एक खाशी युक्ति काढली. त्यानें एके दिवशीं रात्रीं सर्व आळशी

निजले असतां त्या घरास आग लावून दिली; घरांतून ज्वाळा भडाभडा निघूं लागल्या तेव्हां जे आळशाचें ढोंग करून आले होते, ते चट सारे पळून गेले, आणि जे खरे आळशी होते, ते जळत्या घरांत तसेच पडून राहिले, आणि आतां ते खचित भस्मसात् होणार अशी जेव्हां त्या अम्मलदाराची खात्री झाली तेव्हां त्याणें त्यांस बाहेर काढावें, म्हणून आपल्या शिपायांस हुकुमाविलें. हे आळशी बाहेर निघाल्यावर त्यांसच फुकट खावयास घातलें जाऊं लागलें. अशा रीतीनें खोगीरभरतीचे जे आळशी जमले होते, त्यांचा त्रास नाहींसा झाला; त्या दिवसापासून त्या गांवास साळशी ( सहा आळशी ) हें नांव पडलें.

**तुळापुर** हेंही नांव एका इतिहासप्रसिद्ध प्रस्तावाची आठवण करून देतें. तुळापूर म्हणून पुण्याजवळ भीमा नदीच्या कांठीं एक लहानसें खेडें आहे. ह्या खेड्यास हें नांव पडण्यास कोणचा प्रस्ताव कारण झाला हें पुढील गोष्टीवरून वाचकांचे लक्षांत येईल. औरंगजेब बादशाहा दक्षिणेंतून प्रवास करीत असतां एका तरीजवळ आला. बादशहाचे घोडेस्वार तरीच्या पलीकडे जात असतां तो कांहीं वेळ कांठावर उभा होता. त्याची आणि तरीवाल्याची गांठ पडली व इकडच्या तिकडच्या गोष्टी चालल्या असतां त्या तऱ्यानें बादशाहास म्हटलें "मला ज्या प्राण्याच बरोबर वजन सांगतां येणार नाहीं, असा प्राणीच नाहीं." त्यावरून अवरंगजेब बादशाहानें लागलेंच आपल्या स्वतःच्या हत्तीचें वजन सांगण्यांस तरीवाल्यास फर्माविलें. त्यावरून तऱ्यानें त्या हत्तीस आपल्या होडींत चढविलें; मग हत्तीच्या वजनानें ती होडी जेथवर पाण्यांत बुडाली होती तेथें एक रेघ ओढून तऱ्यानें

खूण केली. नंतर त्या तऱ्यानें हत्तीला होडीच्या बाहेर काढलें. मग त्याच रेषेपर्यंत होडी पाण्यांत बुडेतोंपर्यंत मोठमोठे धोंडे तिच्या आंत घातले. मग धोंड्यांचीं वेगळीं वेगळीं वजनें एकत्र करून हेंच वजन हत्तीचें आहे असें त्यानें बादशाहास सांगितलें. त्याची समयसूचकता व कल्पनाशक्ति पाहून बादशाहा इतका खुष झाला कीं, त्यानें त्याला व त्याच्या वंशजांना तें गांव इनाम दिला व त्या गांवाचें जुनें नांव रद्द करून त्याचें "तुळापूर" असें नवीन नांव ठेविलें.

कित्येक स्थळांच्या नांवांत लोकांची भ्रमात्मक कल्पना दृष्टीस पडते. हल्लींचा **मद्रास** हा प्रांत पुराणप्रसिद्ध शल्य राजाचा देश आहे असा वर्णसादृश्यावरून लोकांचा भ्रम होऊन त्यास मद्रदेश असें नांव दिलें जातें आणि इतकेंच नव्हे तर "पुराणप्रसिद्ध मद्रदेश" किंवा "शल्याच्या राजधानीचें स्थळ" असेही प्रयोग कधीं कधीं वर्तमानपत्रांत दृष्टीस पडतात; परंतु भरतखंडाचा प्राचीन इतिहास ज्यास अवगत आहे, त्यास ही लोकांची चुकी सहज समजण्याजोगी आहे.

**चाणक्षः**—आतां वृत्तगर्भ शब्दांची कांहीं संकीर्ण उदाहरणें देतों. चाणक्ष ( धूर्त ) हा शब्द नंदराजे व मौर्य यांच्या मधील युद्धाचें स्मरण करून देतो. चाणक्य हा मौर्यांच्या पक्षाचा मंत्री असून त्यानें नंदवंशीयांचा वरचष्मा कसा मोडला व प्रतिपक्षीयांचा मंत्री जो राक्षस त्यास आपल्या पक्षास कसें अनुकूळ करून घेतलें, हें मुद्राराक्षस नाटकांत वर्णिलेलें वाचकांस स्मरत असेल. **रांठः**—राठ हा शब्द आपणांस महाराष्ट्रांत पूर्वी ज्या रठ्ठ लोकांनीं राज्य केलें त्या लोकांचा कणखरपणा व सोशिकपणा ह्या गुणांची आठ-

वण करून देतो. **पाहारा:**—पाहारा ( रखवाली ) ह्या शब्दावरून प्रहरा प्रहरानें पाहारेकरी बदलण्याची चाल असे असें व्यक्त होतें. "**राम राम**" हा मराठे लोकांची व हलक्या जातीचे लोकांची कोणाशीं भेट झाली असतां उच्चारावयाचा आनंदसूचक शब्द रामदास स्वामीमहाराजांच्या वैभवाची व त्यांच्यावर शिवाजीची असलेली भक्ति यांची आठवण करून देतो.

**अटक** ( मर्यादा ) हा शब्द थोरला बाजीराव ज्याणें दिगंतव्यापिनी कीर्त्ति मिळविली व मराठ्यांचें नांव बलाढ्य अशा यवनी पादशाहास सुद्धां दहशत भरविणारें केलें, त्या बाजीरावाच्या पराक्रमाची आठवण करून देतो. **चाळिशी** शब्दावरून आपल्या लोकांस उपनेत्र लावण्याची सरासरी मानानें कोणच्या वयांत जरूर पडते, हें व्यक्त होतें. **भोहणी** शब्दावरून आपल्या व्यापारी लोकांची भवानीचें नांव घेऊन खरेदी, विक्री करावयाची चाल समजते. **गवाक्ष** ( गो+अक्ष ) शब्दावरून प्राचीनकाळीं खिडक्यांचा आकार कसा असे हें समजतें. **बेळगांव** ( वेणुग्राम ) शब्दावरून पूर्वीं तेथें चिव्यांचें ( म्ह० वेळूंचें ) रान निबिड होतें, हें समजतें.

**नणंद** हा शब्द निषेधार्थक " न " व सुखी होणें ह्या अर्थाच्या "नंद्" धातूपासून उत्पन्न झाला आहे. ननंद ( नणंद ) म्हणजे " सुख न पावणारी " ; नणंद ह्या शब्दावरून नणंदाभावजयांचें हल्लींचे प्रमाणें पूर्वींपासूनही वैमनस्य असे, असें व्यक्त होतें. नणंदेस आपण माहेरवाशीण आहों म्हणून घरांत आपली सत्ता असावी असें वाटत असतें व भावजयीस आपण नेहमी घरांत असणारी व घरच्या यजमानाची बायको म्हणून घरधनीण आहों व अतएव आपली सत्ता घरच्या

कारभारांत असावी, उफलाणू येणाऱ्या नणंदेची सत्ता नसावी, असें वाटतें; ह्याप्रमाणें नणंद व भावजय ह्यांच्यामध्यें नेहमी तेढा असतो. भावजयीचें वर्चस्व घरांत असावें हें योग्य आहे व हें वर्चस्व नणंदेनें कबूल करणें हेंही योग्यच आहे; परंतु भावजयीचें वर्चस्व कबूल करण्यास नणंद नेहमी नाखुष असते. ह्यावरून तिला "ननंद" अथवा नणंद (आनंद न पावणारी) असें नांव मिळालें.

**लिपि** हा वर्णमालेचा वाचक शब्द लेप करणें ह्या अर्थाच्या सं० "लिप्" धातूपासून आलेला आहे. यावरून असें सिद्ध होतें कीं, अक्षराचीं चिन्हें ठरविलीं गेलीं तेव्हां रंगाच्या पातळ पदार्थाचा लिहिण्याचे कामीं उपयोग केला जात असे. **वर्ण** हा तरी अक्षरांचा वाचक शब्द वरील सिद्धांतच समर्थितो, हेंही वाचकांचे लक्षांत येईल.

"**लेखन**" (सं० लिख्=ओरखडणें) ह्या शब्दावरून प्रथम झाडाच्या साली वगैरे कठिण पदार्थांवर रेघा ओढून आपले पूर्वज अक्षरांच्या आकृति काढीत असत व रंगानें ह्या आकृति काढण्याची कला मागाहून उत्पन्न झाली असें सिद्ध होतें. पोथीचें किंवा पुस्तकाचें **पत्र** किंवा **पर्ण** हे शब्द प्रथम वृक्षाच्या पानावर लेखनक्रिया घडत असे असें दाखवितात.

**राजा** ह्या शब्दावरून आपण राजाचें कर्तव्य काय समजतों हें व्यक्त होतें. त्याची व्युत्पत्ति "रंजयतीति राजा" (प्रजेस सुख देईल तोच राजा) अशी आहे. प्रजेवर जुलमी कर बसवून प्रजेच्या वेगळ्या वेगळ्या संघांत दुही उत्पन्न करून प्रजेची एकी व गुण्यागोविंदभाव नष्ट करून, आपले जुलूम बिनहरकत करतां येतील अशी निंद्य इच्छा धरून राज्य करणारास आपण राजा अशी संज्ञा लावणार

नाहीं. **प्रधान** ह्या शब्दावरून राज्याची सर्व जबाबदारी प्रधानावर असे, राज्याचें जोखीम त्याच्या अंगावर असे, व राज्यांत मुख्य व खरा अमलदार तोच असे, असें व्यक्त होतें.

भाषेंतील शब्दांमध्यें कधीं कधीं आपले खोटे ग्रह, निराधार कल्पना व भ्रांतिमूलक सिद्धांत हे कायमचें वास्तव्य करून राहिलेले दृष्टीस पडतात. अशा शब्दांचीं उदाहरणें मराठी भाषेंत पुष्कळ आहेत. अशा जातीचा **पांडवकृत्य** हा एक शब्द होय. डोंगर पोखरून केलेल्या देवळास आपण पांडवकृत्य म्हणतों. हा शब्द अस्तित्वांत येण्यास जी कल्पना कारण झाली ती ही कीं, पांडव अज्ञातवासांत असतां त्यांनीं आपणांस राहण्याकरितां हीं वसतिस्थानें केलेलीं होत. ही कल्पना अर्थात् निराधार होय. ह्या पांडवकृत्यासंबंधानें एक उतारा वाचकांस सादर करितों.

" मुसलमान लोकांनीं स्वाऱ्याकरून आपला अंमल ह्या देशांत बसविण्याच्यापूर्वी हिंदुस्तान देशाची स्थिति पुष्कळ अंशीं फारच चांगली होती, असें अनेक गोष्टींवरून सिद्ध होतें. प्राचीनकाळचे जे कांहीं ग्रंथ राहिले आहेत त्यांवरून, त्या काळाच्या व्यापारावरून, त्याकाळीं ह्या देशांत अपार संपत्ति होती असे जे यवन लोकांत लेख आहेत त्यांवरून, व त्याकाळच्या ज्या कांहीं थोड्या इमारती काळचक्राच्या व दुरभिमानी क्रूर शत्रूंच्या झपाट्यांतून उरल्या आहेत त्यांवरून वर सांगितलेलें अनुमान सिद्ध होतें. हिंदुस्तानच्या अनेक भागीं व विशेषतः दक्षिणेंत पुष्कळ ठिकाणीं डोंगरांतले खडक कोरून मोठमोठीं देवळें तयार केलेलीं हल्लीं आढळतात. व हीं देवळें अप्रसिद्ध ठिकाणीं व निवाऱ्याच्या जागीं असल्यामुळें त्यांस हिंदुधर्मद्वेष्टे, क्रूर, अज्ञान अशा मुसलमान अमलदारां-

पासून व वारा, ऊन, पाऊस, ह्यांपासूनही फारसा उपद्रव झाला नाहीं, तेणेंकरून तीं आजपर्यंत टिकलीं आहेत. हीं देवळें कधीं व कोणीं बांधिलीं, ह्याचा अद्यापि चांगला शोध लागला नाहीं. ह्यांस लेणीं असें म्हणतात. साधारण लोकांत दंतकथा अशी आहे कीं, हीं देवळें पांडव वनवासांत होते, त्यावेळेस त्यांनीं कोरलीं आहेत; व ह्या दंतकथेवरून त्यांस पांडवकृत्यें असेंही एक नांव पडलें आहे. आतां ह्या इमारती पांडवांनीं कोरल्या नाहींत हें सिद्ध करणें अगदीं कठीण नाहीं. ह्या दंतकथेस पहिलें विरुद्ध प्रमाण हें कीं भारत नामक ज्या पुराणांत पांडवांच्या गोष्टी लिहिल्या आहेत, त्या पुराणांत त्या राजपुत्रांनीं हीं देवळें कोरल्याची गोष्ट मुळींच नाहीं. व त्या पुराणावरून पाहिलें असतां पांडव दक्षिणेंत आले होते असेंही अनुमान होत नाहीं. ह्या कोरींव देवळांपैकीं कांहीं देवळें ब्राह्मणांच्या देवांचीं आहेत, कांहीं जैनांच्या व बौद्धांच्या देवांचीं आहेत; ह्यावरून तीं भिन्न लोकांनीं व बहुतकरून भिन्न काळीं बांधलीं असावीं असें सिद्ध होतें. ह्याप्रकारचीं देवळें, घारापुरी, कान्हेरी, कारलें, वेरूळ, जुन्नर इत्यादि बहुत ठिकाणीं आहेत."*

असत्यमूलक शब्दांचा एक मुख्य उगम म्हटला म्हणजे फलज्योतिष हें होय. ज्योतिष म्हणजे ग्रहादिकांच्या गति, गतींचे नियम, त्यांचीं एकमेकांवर गुरुत्वाकर्षणाच्या योगानें घडणारीं कार्यें इत्यादिकांच्या संबंधाचें शास्त्र; हें शास्त्र सत्याच्या पायावर उभारलेलें असून त्याचे सिद्धांत व शोध हे खरे असतात. आणि उलटपक्षीं फलज्योतिष म्हणजे ह्या ग्रहांच्या स्थितीवरून भूमीवरील प्राण्यावर घडणाऱ्या परिणामांचें शास्त्र. ग्रहांचा भूस्थ

* अनेक विद्या मूलतत्व संग्रह पान २७३-४

प्राण्यावर कोणत्याही प्रकारचा परिणाम घडूं शकत नाहीं असें सर्व सुधारलेलीं राष्ट्रें हल्लीं कबूल करितात, व आपणामधील सुशिक्षित लोकांचेंही तेंच मत आहे. फलज्योतिषाविषयीं कै० रा० रा० विष्णुशास्त्री चिपळोणकर ह्यांचा एक चरचरीत लेख आहे तो वाचकांनीं लक्षपूर्वक वाचला असतां फलज्योतिषाची असत्यता व अशक्यता ही त्यांस कळून येईल. त्याचा ऊहापोह आम्हांस येथें करतां यावयाचा नाहीं. असो, तर ह्या फलज्योतिषावरून आपल्या भाषेंत रूढ झालेले शब्द पुष्कळ आहेत. संक्रांत बसणें, राशीस येणें, शनीसारखा द्वाड, शनीश्वरासारखा खोडकर, राहु, केतु, ग्रहण लागणें, वेध लागणें, छाया पडणें, इत्यादि पुष्कळ शब्द असत्यमूलक कल्पनेवरून भाषेमध्यें रूढ झालेले आहेत. फलज्योतिषाचा खोटेपणा जरी आतां पूर्णपणें आपल्या प्रतीतीस येत आहे तरी आपण राशीस येणें वगैरे सारखे प्रयोग बेलाशक करतों, आणि असेच पुढेंही करीत राहूं. या शब्दामध्यें आपल्या भ्रांतिमूलक कल्पना चिरस्थायी होऊन राहिल्या आहेत. पूर्वीं आपल्या डोक्यांत काय काय वेडें होतीं त्यांची हे शब्द उत्तम साक्ष देतात.

येथें एका प्रसंगोपात्त प्रश्नाचें विवेचन करणें आवश्यक आहे. कित्येक लोकांचा असा पूर्वपक्ष आहे कीं " वस्तुस्वरूपाच्या असत्य ज्ञानावर किंवा असत्य वस्तूच्या ज्ञानावर ज्या शब्दांचा पाया आहे त्या शब्दांस भाषेमध्यें थारा द्यावा काय? ज्या काळीं वस्तूंचें खरें स्वरूप मनुष्यास अगवत नव्हतें, किंवा ज्याकाळीं वस्तूंचें ठायीं असत्य धर्माचा आरोप अज्ञानामुळें केला जात असे, तेव्हां जे शब्द मिथ्याकल्पनावरून प्रचारांत आले, ते आपण भाषेमध्यें राहूं द्यावे काय? ज्या शब्दांची

व्युत्पत्ति असत्याच्या पायावर अवलंबून आहे ते शब्द त्या असत्याचा परिस्फोठ झाल्यावर आपण भाषेंतून हाकून लावूं नयेत काय?"

असा प्रश्न कितीएक विद्वान् लोक करितात, परंतु ह्या प्रश्नाचा स्वयमेव उलगडा झालेला आहे. शब्द जरी असत्यमूलक असले तरी ते भाषेमध्यें हक्कानें राहातील आणि त्यांनीं राहवेंही हें योग्य आहे. शब्दांचा जर भाषेवर व्युत्पत्तीच्याच द्वारानें हक्क चालत असता तर असत्यमूलक शब्द भाषेंतून केव्हांच नष्ट होऊन गेले असते. परंतु शब्दांचा व्युत्पत्तीच्याच द्वारानें हक्क चालतो असें नव्हे. रूढीच्या द्वारानेंही चालतो. किंबहुना व्युत्पत्तीपेक्षां रूढीवरच शब्दांची प्रतिष्ठापना बलवत्तर असते. केळीचा कोंब ज्याप्रमाणें बाल्यावस्थेंत असतांना मुख्य केळीपासून आपलीं पोषक द्रव्यें शोषून घेतो, परंतु तो मोठा झाला म्हणजे त्याला जमीनींत स्वतांचीं पाळें मूळें फुटून तो स्वतःच्या जोरावर आपलें पोषण करून घेतो, व वनस्पतीचीं सर्व कर्तव्यें करूं शकतो, आणि मूळच्या केळीची त्यास आवश्यकता राहत नाहीं; मूळच्या केळीचा आणि त्याचा संबंध तुटला आणि ती केळ मरून गेली तरी त्याच्या जीवनक्रियेस कोणत्याही प्रकारें हरकत होत नाहीं; त्याचप्रमाणें शब्द जरी मूळारंभीं व्युत्पत्तीवर अवलंबून असले तरी कालातिक्रमानें त्यांस भाषेमध्यें स्वतःचें स्वतंत्र जीवित प्राप्त होतें, व पुढें व्युत्पत्तीशीं जरी त्यांचा संबंध तुटला, किंवा व्युत्पत्ति असत्यमूलक ठरली, किंवा व्युत्पत्ति नष्ट झाली तरी त्या शब्दाच्या अस्तित्वास कोणत्याही प्रकारचा बाध येऊं शकत नाहीं. सूर्य स्थिर आहे आणि पृथ्वी दैनंदिनगतीनें आपल्या अक्षाभोंवती फिरत असते, हें जरी आपणास कळलें

आहे, तरी सूर्य उगवला, सूर्य कासराभर वर आला, इत्यादि प्रयोग करण्यास कांहीं हरकत नाहीं. वास्तविक पाहतां सूर्य कासराभर वर येत नाहीं तर पृथ्वी उलट दिशेनें कासराभर खालीं जाते. तथापि सूर्य कासराभर वर आला हाच प्रयोग प्रचारांत राहील. त्याच प्रमाणें साळूबाईच्या पंचपाळ्यास सहा पाळीं असलीं व झिंगूबाईच्या पंचपाळ्यास सात पाळीं असलीं तर झिंगूबाईनें साळूबाईस तुच्छ मानावयास कांहीं हरकत नाहीं; किंवा बकूबाईनें आपला चौफुला सात फुलांचा करण्यास सोनारास सांगितलें तरी सोनारास हांसण्याचें कांहीं कारण नाहीं. तसेंच तीन महिन्यांनीं प्रसवलेल्या साठक्या साळी मोठ्या रुचकर लागतात, अशी कोंकणी शेतकऱ्यांनीं खुशाल बढाई मिरवावी. लहान मुलांस सोमवार, मंगळवार, इत्यादि वारांचीं नांवें सांगून शेवटीं "आठवड्याचे दिवस सात" असें सांगून पंतोजी बावांनीं हें मुलांस घोकावयास लावलें तर त्या पंतोजी बावांनीं कांहीं चुकी केली असें होत नाहीं; तसेंच एकाद्या गवळ्यानें सोनूबाईस पंधरवडाभर दुधाचा रतीब घातला तर सोनूबाईकडून त्यास चवदा दिवसांचे पैसे मिळाले तर आपण फसलों असें गवळ्यास वाटावयाचें कारण नाहीं. फौजदारी खटल्यांत दोन किंवा तीन पंच नेमले जातात. आपल्या आलीकडच्या पंचांगांत पांच त्रिक अंगें असतात. तेलंगी लोक पांच जानव्यांचा एक जोडा करितात वर निर्दिष्ट केलेले अशुद्ध शब्द व अशुद्ध प्रयोग भाषेमध्यें पाळें मुळें घालून स्थैर्य पावले आहेत, त्यांना स्थानभ्रष्ट करितां यावयाचें नाहीं व करणें इष्टही नाहीं. आम्हीं वर्गामध्यें एकदां मराठी कविता स्पष्ट करून सांगत असतां एका कवितेंत "पीतांबर" हा शब्द आला होता. आम्हीं मुलांस विचारलें "तुम्हीं कधीं पीतांबर

पाहिला आहे काय? " मुलें म्हणालीं " होय, आम्हीं पाहिला आहे. " त्यावरून आम्हीं विचारलें " तुम्हीं कोणत्या रंगाचे पीतांबर पाहिले आहेत? " मुलांनीं उत्तर दिलें " तांबड्या रंगाचे. " त्यावरून आम्हीं " तांबडा पीतांबर " हा प्रयोग शुद्ध आहे किंवा अशुद्ध आहे असें विचारलें; कांहीं जीं खोगीरभरतीचीं मुलें होतीं त्यांणीं एकदम प्रयोग अशुद्ध असें उत्तर दिलें, परंतु दोघां तीघां विचारी मुलांनीं म्हटलें, "पीतांबर म्हणजे पिवळें वस्त्र असा जरी मूळचा अर्थ असला व पिवळेपणावरून जरी त्या वस्त्रास पीतांबर असें नांव पूर्वीं पडलें असलें तरी आतां पीतांबर शब्द एक प्रकारचें रेशमी कापड इतकाच अर्थ दाखवितो आणि म्हणून तांबडा पीतांबर किंवा पिवळा पीतांबर किंवा दुसऱ्या कोणत्याही रंगाचा पीतांबर असूं शकेल. " आदल्या वर्षीच्या कोजागरी पौर्णिमेस देव्हाऱ्यावर किंवा दारावर लटकत सोडलेलें जुनें " नवें " काढून टाकून त्याचे जागीं नवें " नवें " घालावयाचे वेळीं मुलें जर म्हणालीं, "आमचें एका वर्षाचें जुनें नवें असून तें नव्या नव्यापेक्षां अधिक सुरेख दिसतें," तर त्यांत त्यांची कांहीं चुकी होईल असें कोणास वाटावयाचें नाहीं.

वर आम्हीं म्हटलें आहे कीं असत्यमूलक शब्दांस व प्रयोगांस भाषेंतून हांकून लावतां यावयाचें नाहीं, व हांकून लावणें इष्ट नाहीं. शब्द भाषेमध्यें एकदा रूढ झाले म्हणजे ते भाषेच्या जीविताचीं अंगें होऊन जातात व त्या अंगांचा छेद करणें म्हणजे भाषेच्या जीवितास धक्का पोंचविण्यासारखें आहे. शब्द एकदा भाषेच्या जीविताचीं अंगें ह्या स्थितीस जाऊन पोंचले म्हणजे ते मनुष्याच्या अधिकाराबाहेर जातात,

म्हणजे त्यांचेवर मनुष्याची इच्छा चालूं शकत नाहीं. ते भाषेच्या नियमांनीं चालतात, मनुष्यकृत नियमांनीं चालत नाहींत.

एकाद्या मनुष्याच्या शरीराचे कांहीं भाग बोजड व बेडौल असले तर कधीं कोणी ते कापून टाकावे अशी शिफारस करीत नाहीं. कारण ते भाग त्याच्या जीवच्छरीराचे कायमचे भाग असल्या कारणानें त्यांना धक्का देणें म्हणजे साऱ्या शरीरास धक्का पोंचविण्याप्रमाणें होईल. शरीराच्या व्यापारास ते भाग सर्वथैव पात्र असतात व त्यांच्या अस्तित्वावर शरीराचें जीवित कमजास्त मानानें अवलंबून असतें. त्या प्रमाणेंच भाषेमध्यें जरी कांहीं असत्यमूलक शब्द असले तरी ते त्या भाषेच्या जीवितास आवश्यक असतात व भाषा जर ठार मारून टाकावयाची नसेल तर त्यांस अर्धचंद्र देण्याचा प्रयत्न सिद्धीस जावयाचा नाहीं. तेव्हां एकंदरींत सांगावयाचें म्हणून एवढेंच कीं शुद्धाशुद्धपणाचा वृथाभिमान बाळगून " तांबडा पीतांबर " " लाल शाई " वगैरे प्रमाणें असत्यमूलक किंवा विरोधगर्भ शब्दांस भाषामंदिरांतून अर्धचंद्रप्रदानानें बाहेर काढण्याचा प्रयत्न कोणी पंडितानें केला तर तो वाया जाऊन तो लोकांच्या उपहासास मात्र पात्र होईल. असत्यमूलक शब्दांचा उच्छेद करणें जसें शक्य नाहीं तसेंच तें इष्टही नाहीं. तेणेंकरून आपण अनवस्थाप्रसंगाच्या दोषास पात्र होऊं. असत्यमूलक शब्दांचा उच्छेद करावयाचा असें एकदा आपण ठरविलें म्हणजे भाषेच्या स्थैर्याचा एक महत्त्वाचा आधारस्तंभच नाहींसा होईल.

मनुष्य प्राणी सर्वज्ञ नाहीं व सर्वज्ञ कधींच व्हावयाचा नाहीं. अनंत शास्त्रांचें व अनंत वस्तूंचें ज्ञान मनुष्य कसा मिळवूं शकेल? तसेंच मनुष्यानें जें ज्ञान संपादिलें आहे तें तरी

असत्यमूलक, किंवा भ्रांतिमूलक नव्हे, असें कोण म्हणूं शकेल? आज जें ज्ञान आपणांस सत्यमूलक असें वाटतें, तें कालांतरानें व दीर्घ शोधानें खोटें असें ठरण्याचा संभव आहे, किंवा अपुरतें अहे असेंही ठरण्याचा संभव आहे. आपले पूर्वज ज्या गोष्टी खऱ्या समजून त्यांजवर विश्वास ठेवीत त्यांचा खोटेपणा आजमितीस आपल्या प्रत्ययास येत आहे. अशी जर ज्ञानाची उत्तरोत्तर वृद्धि होत जाणें हें सृष्टिनियमांस अनुसरून आहे तर पूर्व कल्पनांच्या पायावर रूढ झालेल्या शब्दांची कोठवर शुद्धि करीत बसावें? आज कांहीं नवा शोध लागला कीं जुन्या कल्पनेस अनुसरून रूढ झालेल्या शब्दांस एकदम फांटा द्यावयाचा व नवीन शब्द घडवून ते प्रचारांत आणावयाचे; हा नवीन शोध चुकीचा आहे, असें जर पुढें कालांतरानें सिद्ध झालें तर हे शब्द रद्द करून पुन्हां आणखी नवीन शब्दांची टांकसाळ काढावयाची. याप्रमाणें नेहमीं जुने शब्द रद्द करावयाचा व नवे शब्द उत्पन्न करावयाचा कारखानाच सुरू होईल, आणि अशा कृत्यांत लोक व्याप्त झाले म्हणजे ज्ञानार्जनाचें काम कसें चालेल? व लोकव्यवहार तरी कसा चालेल? ज्ञानाच्या वृद्धीबरोबर ज्या लोकांचें पाऊल पडत नाहीं, अशा अज्ञ लोकांस तदितर लोकांचें भाषण कसें समजेल?

जुना शब्दसंग्रह पृथग्जनांत माहीत होतो न होतो इतक्यांतच कोणी नवा शोध लावला तर पुन्हा पहिला शब्दसंग्रह माजी पडून नवा तयार होईतोंपर्यंत सर्व व्यवहार बंद पडणार. किंवा दुसरी एक कल्पना करा. एकाद्या वस्तूच्या संबंधानें दोन महापंडितांत मतभेद असला तर पृथग्जनांनीं कोणाचा शब्दसंग्रह स्वीकारावा? एकमेकांचे विचार एकमेकांस कसे कळतील? असत्यमूलक किंवा भ्रांतिमूलक शब्दांचा उच्छेद

करून टाकण्याचा ठराव केला असतां एकच ब्रह्मघोटाळा होईल. भाषेचें स्थैर्य नाहींसें होईल. वाङ्मयाची उत्पत्ति व्हावयाची नाहीं; शास्त्रें, कला हीं वाढावयाचीं नाहींत, व लवकरच रानटी स्थिति मनुष्यास प्राप्त होईल.

हाच मुद्दा दुसऱ्या एका उदाहरणावरून स्पष्ट करून दाखवितां येईल. असें समजा कीं एकादा मेस्त्री आपलीं हत्यारें घेऊन कांहीं नक्षीचें काम करीत आहे; त्याच्या यजमानानें त्यास जर प्रत्येक पांच पांच मिनिटांनीं नवीं नवीं हत्यारें वापरावयास सांगितलें तर त्याचें काम होईल काय? आणि आपल्या मुद्याचा हास्यास्पदपणा अधिक स्पष्ट करण्यासाठीं आपण आणखी अशी कल्पना करूं. दर पांच मिनिटांनीं वापरावयाचीं जीं हत्यारें तीं पूर्वींच्या हत्यारांपेक्षां वजनानें, लांबीरुंदीनें, धरावयाच्या धाटणीनें, भिन्न आहेत; तर मग अशा हत्यारांनीं अत्यंत कुशल कारागिरास तरी कांहीं काम करतां येईल काय? तर सारांश म्हणून इतकाच कीं, एकदा भाषेमध्यें शब्द जे विचारास साधनभूत होत ते रूढ होऊन गेले म्हणजे मग त्यांस कोणत्याही कारणानें उच्छिन्न करणें हें इष्ट नाहीं; त्यापासून हानि होईल.

असत्यमूलक किंवा भ्रांतिमूलक जे शब्द ते भाषेमध्यें राहूं देणें हेंच शहाणपणाचें काम आहे. शाई हा शब्द फारशी असून त्याचा अर्थ काळी वस्तू असा आहे. (सीयाह=काळा, सीयाही=काळेपणा किंवा काळी वस्तु.) रुमाल हाही फारशी शब्द असून त्याचा अर्थ तोंड पुसावयाचें फडकें असा आहे. (रू=तोंड, मालीदन्=पुसणें). तेल* (तैल) हा शब्द संस्कृत

* मराठींतील "तेल" हा शब्द संस्कृतांतील "तैल" ह्याच शब्दापासून आलेला आहे; संस्कृतांतील 'तैलच्' ह्या प्रत्ययाशीं "तेल" ह्याचा कांहीं संबंध नाहीं.

असून त्याचा अर्थ तिळांचा स्नेह, किंवा निष्यंद असा आहे. आगगाडी हा मराठी शब्द आहे. त्याचा अर्थ विस्तवानें चालणारी गाडी असा आहे. तसेंच सूतक (सुतक) ह्याचा अर्थ कुटुंबांत मूल जन्मल्यामुळें आलेलें अशौच व शास्त्रोक्त कर्मांविषयीं अनधिकार असा आहे. तथापि तांबडी शाई, पुस्तकें बांधावयाचा रुमाल, डोईचा रुमाल, भुईमुगाचें तेल, विजेची आगगाडी किंवा बाप मेल्याचें सुतक इत्यादि विरोधगर्भ प्रयोग सदोष होऊं शकत नाहींत. पुणें प्रांतीं कर्नाटकांतल्याप्रमाणें पेवांचे संडास नसून त्यांस शौचकूप असें म्हणतात. करंगळी (करांगुलि) हाताचें बोट असा अर्थ असून पायाची करांगुळी असेंही म्हणतात. घड्याळ (घट्यालय) ह्याचा अर्थ घटी दाखविण्याचें साधन असा असून आपण तो "तास दाखविण्याचें साधन" ह्या अर्थीं योजतों; गोमाशी हा गाईच्या अंगावर वस्ती करणारा एक किडा आहे. तथापि आपण "चालत्या घोड्यावरच्या गोमाशा" अशी म्हण वापरतों. फार्स हा इंग्रजी शब्द असून त्याचा अर्थ त्या भाषेंत मजेदार किंवा विनोदात्मक किंवा उपहासात्मक लहानसें नाटक असा आहे. परंतु "नारायणरावाच्या वधाचा फार्स!" असें आपण म्हणतों.

सदरहू प्रयोग जरी शास्त्रदृष्ट्या व तत्त्वदृष्ट्या अशुद्ध आहेत तथापि त्यांस भाषेंतून काढून लावणें शक्य नाहीं. कारण भाषेमध्यें रूढीच्या द्वारानें त्यांची प्राणप्रतिष्ठा झालेली आहे.

ह्या भागांतील वृत्तगर्भ शब्दांच्या संबंधानें जें विवरण केलें आहे त्यावरून वाचकांची खात्री झालीच असेल कीं, शब्दांचे ठायीं प्राचीन गोष्टी, इतिहास, आचार वगैरे अनेक प्रकारची उपयुक्त माहिती आढळते व शब्दांचे परीक्षणानें देशाचा इतिहास स्थूल मानानें उभारतां येतो हें म्हणणें अतिशयो-

क्तीचें नाहीं. शब्दांचा तत्परतेनें अभ्यास करणें हें व्यर्थ वेळ घालविण्याप्रमाणें नाहीं हेंही वाचकांस कळून आलेंच असेल.

---

## उपसंहार

मागील भाग ज्या वाचकांनीं लक्षपूर्वक वाचले असतील त्यांस कळून आलेंच असेल कीं, शब्दांचा अभ्यास हें एक ज्ञानप्राप्तीचें साधन असून शिवाय सूक्ष्म अवलोकनाची संवय होण्यास त्याचा फार उपयोग आहे. आणि आमचें तर असें मत आहे कीं ज्ञानप्राप्तीचें एक साधन ह्या दृष्टीनें शब्दांच्या अभ्यासाचें महत्त्व जें आहे त्यापेक्षां सूक्ष्म अवलोकन व सूक्ष्म परीक्षण ह्यांची संवय ही अधिक महत्त्वाची आहे. आणि शब्दांचा अभ्यास हा सूक्ष्म अवलोकनाची संवय मुलांस लावून देऊन मनोरंजक रीतीनें त्यांस ज्ञानप्राप्ति करून देतो. ह्याकरितां हें अत्यंत इष्ट आहे कीं, शब्दांची व्युत्पत्ति, त्यांचे मूळचे अर्थ, अर्थांचा विपर्यास होण्याचीं कारणें, शब्दांच्या अर्थाचा संकोच, व्याकोच, आणि उत्सार, तदंतर्गत ज्ञान बाहेर काढण्याचे मार्ग, वगैरेकडे आपल्या शिक्षक वर्गाचें लक्ष बिलकूल नसतें, तें तिकडे लागावें. आमच्या ह्या लहानशा निबंधांत निर्दिष्ट केलेल्या दिशेनें शब्दांचा अभ्यास ज्या कोणी केला नसेल, तो मराठी भाषेमध्यें इतर बाबतींत कितीही तरबेज असला तरी त्यास मराठीचा पंडित हें नांव देणें योग्य होणार नाहीं. ज्या कोणास ही भाषापरिज्ञानाची शाखा अवगत नाहीं तो मराठी भाषेचा पंडित ह्या बहुमानाच्या पदवीस योग्य नाहीं.

ह्या वर सांगितलेल्या दोन उपयोगांशिवाय तिसराही एक मोठा उपयोग शब्दांच्या परीक्षणापासून होण्याजोगा आहे. तो हा कीं मराठी भाषेविषयीं जो तिरस्कार बहुतेक

इंग्रजी जाणणाऱ्यांचे ठिकाणीं कायमचें वास्तव्य करून राहिलेला आढळतो, तो अशा प्रकारच्या अभ्यासापासून नष्ट होऊन मराठीची प्रौढी किती आहे, हें त्यास कळून येईल. मराठी भाषेविषयीं जे तिरस्कारमूलक किंवा निदान खेदमूलक अभिप्राय त्यांच्या तोंडून एकूं येतात, ते ह्या प्रकारच्या शब्दांच्या अभ्यासापासून निरस्त होतील.



# या निबंधांत उद्धाटिलेल्या शब्दांची यादी.

### उपोद्घात.

१ पातक
२ पंक
३ छांदिष्ट
४ आर्ष
५ लाघवी
६ व्रात्य
७ साला
८ भट
९ ब्राह्मण
१० फिरंगी

### कवित्वगर्भ

११ वाचणें
१२ भांगाचें पाणी
१३ उडाणटप्पू
१४ अजागळ
१५ गयाळ
१६ लाजाळू
१७ नमस्कारी
१८ दीपमाळ
१९ पादप
२० न्यग्रोध
२१ दुपारी
२२ सायंकाळी
२३ तिरसंगी
२४ सदाफुली
२५ बारामासी
२६ आक्षिन्
२७ माधुकरी
२८ गुलजार
२९ गुलाब
३० अश्वघाटी
३१ त्रेसष्ठी
३२ छत्तिशी
३३ चोहोंचा आकडा
३४ अर्धचंद्र
३५ कंगाल
३६ अग्निमुख
३७ आब्रू

### नितिगर्भ

३८ बाणी
३९ साथी
४० कलावती
४१ उचल्या
४२ लांबविणें
४३ लाघवी
४४ हांजी हांजी
४५ उत्संखळ

४६ उर्मट
४७ खोटें
४८ वकल
४९ शागिर्द
५० ब्राह्मण
५१ मिसकीन
५२ वस्ताद
५३ फळार
५४ गावणें
५५ गवसणें
५६ विराकत
५७ सजणा
५८ जरतारी
५९ दारू
६० भादरणें
६१ भादरपट्टी
६२ शिक्षा
६३ शासन
६४ नसीहत ( नश्यत )
६५ राष्टाण
६६ अस्त्रायफट्
६७ हेपळणें
६८ अवलाद
६९ पांडित्य
७० पाक्पटु
७१ वाक्पांडित्य
७२ अद्दल
७३ उपाध्या
७४ बिलंद
७५ शिष्या
७६ आचारी
७७ शौच्य
७८ परसाकडे
७९ धीट
८० धारिष्ट
८१ मर्द
८२ हिय्या
८३ बालबोध
८४ त्वंपुरा
८५ ग्वाही
८६ घरांत आलेली
८७ जंत
८८ जीव
८९ जिवाणू
९० लांब जनावर
९१ महारोग
९२ थोरला रोग
९३ आक्काबाई
९४ सोंवळी
९५ वाढणें
९६ द्वारकेस जाणें
९७ निजधाम

१४९ पत्र
१५० पर्ण
१५१ राजा
१५२ प्रधान
१५३ पांडवकुल्य
१५४ संक्रांत
१५५ राशीस येणें
१५६ शनि
१५७ शनैश्वर
१५८ राहु
१५९ केतु
१६० ग्रहण
१६१ वेध
१६२ छाया
१६३ पंचपाळें
१६४ चौकुला
१६५ साठकें
१६६ आठवडा
१६७ पंधरवडा
१६८ जोडा
१६९ पीतांबर
१७० नवें
१७१ लाल शाई
१७२ रुमाल
१७३ तेल
१७४ आगगाडी
१७५ सूतक ( सुतक )
१७६ शौचकूप
१७७ करंगळी
१७८ घड्याळ
१७९ गोमाशी
१८० फासे

